**महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम,गतिमान व पारदर्शक करणे यासाठी "महाराजस्व अभियान" राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- मराअ २०२०/प्र.क्र.२०/म-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०७ सप्टेंबर, २०२०

**वाचा :** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०२०/प्र.क्र.२०/म-५, दि.०७.०९.२०२०.

**परिपत्रक**

महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम,गतिमान व पारदर्शक करणे यासाठी राज्यात दिनांक ०१.०८.२०२० ते दि.३१.०७.२०२१ या कालावधीकरीता **"महाराजस्व अभियान"** राबविणेबाबत शासन निर्णय क्रमांक,मराअ-२०२०/प्र.क्र.२०/म-५, दिनांक ०७.०९.२०२० रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे.

सदरचा शासन निर्णय या शासन परिपत्रकासोबत जोडला असून तो महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर शासन निर्णयाचा संगणक संकेतांक २०२००९०७१६२४०३७५१९ असा आहे. हे परिपत्रक डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVIRAJ VISHNU PHALLE

Digitally signed by RAVIRAJ VISHNU PHALLE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d1a28181e23383c4e20fc8d5ff3d1c5505f086ea0b1eee531142
b2aeec83a590, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=bea42246bc0bcf44a3792edbf80cc8f17c935de2c6b145c9
6db4be6a8a381506, ou=REVENUE DEPT, o=GOVERNMENT OF
MAHARASHTRA, cn=RAVIRAJ VISHNU PHALLE
Date: 2020.09.08 11:32:10 +05'30'

**( रविराज फल्ले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
४. सर्व जिल्हयांचे मा.पालकमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
७. प्रधान सचिव (वने), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
८. सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
९. सर्व जिल्हयांचे पालक सचिव.
१०. सर्व विभागीय आयुक्त.
११. जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे- ४११ ००१.
१२. नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे -४११ ००१.
१३. सर्व जिल्हाधिकारी.
१४. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी तथा त्यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१५. सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१६. निवड नस्ती, कार्यासन म-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

**महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम, गतिमान व पारदर्शक करणे यासाठी "महाराजस्व अभियान" राबविणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मराअ-२०२० /प्र. क्र.२०/म-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ सप्टेंबर, २०२०

**वाचा :** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- सुजअ २०१३/प्र.क्र.८३/म-८, दि.१८.०७.२०१३,
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०१५/प्र. क्र. ११०/म-५, दि.२९.०७.२०१५,
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०१६/प्र. क्र. १४४/म-५, दि.०१.०८.२०१६,
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०१७/प्र. क्र. १४९/म-५, दि.०१.०८.२०१७,
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०१८/प्र. क्र. १५०/म-५, दि.०१.०८.२०१८.
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक :- मराअ २०१९/प्र. क्र. ९५/म-५, दि.०१.०८.२०१९.

**प्रस्तावना :**

सर्वसामान्य जनता, शेतकरी व शेतमजूर यांचा त्यांच्या दैनंदिन कामकाज व विविध प्रश्नांच्या संदर्भात महसूल विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयांशी नियमित संबंध येतो. शेतकरी व सर्वसामान्य जनतेचे दैनंदिन प्रश्न त्वरित निकाली काढण्याच्या अनुषंगाने राज्यात महाराजस्व अभियान दरवर्षी १ ऑगस्ट ते ३१ जुलै या कालावधीत राबविले जाते. "महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम, गतिमान व पारदर्शक” करण्याच्या अनुषंगाने यावर्षीही "महाराजस्व अभियान" दिनांक ०१ ऑगस्ट, २०२० पासून राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सर्वसामान्य जनता व शेतकरी यांचे महसूल विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयांशी संबंधित दैनंदिन प्रश्न सत्वर निकालात काढणे व महसूल प्रशासन अधिक लोकाभिमुख, कार्यक्षम व गतिमान करण्याच्या दृष्टीने राज्यात दिनांक ०१.०८.२०१५ पासून हाती घेण्यात आलेला "महाराजस्व अभियान" हा महत्त्वाकांक्षी कार्यक्रम सर्व जिल्हयांमध्ये दि.१ ऑगस्ट, २०२० पासून पुढील प्रमाणे अधिक विस्तारित स्वरुपात राबविण्याचा शासन निर्णय घेत आहे.

**२. दिनांक ०१.०८.२०२० ते दिनांक ३१.०७.२०२१ या कालावधीत राबवावयाच्या महाराजस्व अभियानांतर्गंत खालील लोकाभिमुख व प्रशासकीय घटकांचा समावेश राहील:-**

(अ) <u>लोकाभिमुख घटक :-</u>

महाराजस्व अभियानांतर्गत पुढील लोकाभिमुख घटक जिल्हाधिकारी/अपर जिल्हाधिकारी यांचे नेतृत्वाखाली जिल्हाधिकारी कार्यालयापासून गावपातळीपर्यंत प्रभावीपणे राबविण्यात यावेत :-

(i) <u>प्रत्येक गावात शिवारफेरी कार्यक्रम आयोजित करणे</u> :-

महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. आरईव्ही १०२००१/प्र.क्र.४५/टी-२, दिनांक १ ऑगस्ट, २००१ अनुसार महसूली लेखे अद्ययावत करणे व त्यावरुन जमीन मागणी निश्चित करणे याबाबत कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. जिल्ह्याच्या, तालुक्याच्या तसेच गावाच्या भूसंपत्तीचे अचूक व्यवस्थापन व नियमन करण्याच्या दृष्टीने शिवारफेरीचा कार्यक्रम घेणे अत्यंत आवश्यक आहे. जमीन व जमीन वापराचे वस्तुनिष्ठ नियोजन हे शिवारफेरीच्या परिणामकारक अंमलबजावणीवर अवलंबून असून त्यात गावपातळीवरील सर्व कार्यकारी घटकांचा सहभाग महत्त्वाचा आहे. ग्रामपातळीवरील प्रशासकीय घटक तसेच हितसंबंधित व्यक्ती म्हणजेच शेतकरी व ग्रामस्थ यांचे सहभागातून सजगतेने केलेल्या शिवारफेरीतून गावातील जमीन व जमीन वापराचा मांडण्यात आलेला वस्तुनिष्ठ लेखाजोखा हा शिवारफेरी कार्यक्रमाचा गाभा आहे.

त्यानुसार गटनिहाय, गावनिहाय शिवारफेरी करून, जमीन व जमीन वापर पध्दती तसेच पाणी पुरवठ्यांची साधने, जलसिंचनाच्या नोंदी, पिकांच्या नोंदी इ. घटकांची **" अचूक व परिपूर्ण "** माहिती शिवारफेरीच्या माध्यमातून संकलित करुन गाव नमुने १ ते २१ अद्ययावत करण्यात यावेत. प्रत्येक गावात शिवारफेरी कार्यक्रम राबविताना तपासण्यात येणा-या प्रचलित घटकांव्यतिरिक्त खालील घटकांचा देखील समावेश करण्यात यावा:-

(१) गटनिहाय पोट खराब क्षेत्र सर्वेक्षण नोंदी घेणे.
(२) पोत सुधारलेल्या गटांच्या जमिनींचे सर्वेक्षण करणे व नोंदी घेणे.
(३) सिंचित क्षेत्राचे सर्वेक्षण.
(४) पिकांच्या/फळबागांच्या वस्तुनिष्ठ नोंदी घेणे.
(५) पाणी पुरवठा साधनांच्या नोंदी घेणे.
(विहिरी/तलाव/कॅनॉल/ओढे/शेततळे/हातपंप/को.प.बंधारे/सिमेंट बंधारे/मध्यम प्रकल्प इ.)
(६) नदी / नाले / ओढे यांचेवरील झालेल्या अतिक्रमणांची माहिती संकलित करणे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(ii) <u>जमिनीच्या अनधिकृत अकृषिक वापराच्या बाबींची शोध मोहीम घेऊन कारवाई करणे :-</u>

शिवारफेरी कार्यक्रमांतर्गत किंवा स्वतंत्रपणे विशेष मोहीम घेऊन विनापरवाना अकृषिक वापराखाली आणलेल्या जमिनींचा शोध घेऊन त्यासंदर्भात संबंधितांवर दंडात्मक / नियमानुसार कार्यवाही करण्यात यावी. तसेच अशा प्रकरणी विहित कार्यपध्दतीनुसार अनधिकृत अकृषिक वापर नियमानुकूल करणे अथवा निष्कासित करण्याची कार्यवाही पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-२</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(iii) <u>शासकीय जमिनीवरील अतिक्रमणे निष्कासनाची मोहीम राबविणे</u> :-

- शिवारफेरी कार्यक्रमांतर्गत किंवा स्वतंत्रपणे विशेष मोहीम घेऊन शासकीय जमिनींवरील अतिक्रमणांचा शोध घेऊन सदर अतिक्रमणे शासनाच्या प्रचलित धोरणास अधीन राहून निष्कासन करण्याच्या दृष्टीने शासकीय जमिनींवरील सर्व अपात्र अतिक्रमणे कालबध्द कार्यक्रम आखून निष्कासित करण्यात यावीत. नियमानुकूल करण्यास पात्र अतिक्रमणे आढळल्यास त्यासंदर्भात शासनाच्या प्रचलित धोरणानुसार आवश्यक ते प्रस्ताव तयार करुन सक्षम प्राधिका-यांकडे अंतिम निर्णयास्तव सादर करण्यात यावेत.
- शेती प्रयोजनाची अतिक्रमणे नियमानुकूल करण्यासंदर्भात महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक एलईएन १०९०/प्र.क्र.१७२/ज-१,दि.२८.११.१९९१ नुसार तसेच शासनाचे प्रचलित धोरण व आदेश विचारात घेऊन शासकीय व गायरान जमिनीवरील अतिक्रमणे नियमानुकूल/निष्कासित करण्यासंदर्भात प्रकरणपरत्वे उचित निर्णय घेऊन प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याकरिता विशेष मोहीम राबविण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-३</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(iv) <u>इनाम व वतन जमीन शर्तभंग तपासणी व कार्यवाही करणे :-</u>

भोगवटादार वर्ग-२ जमिनीची अद्ययावत "डाटा बँक" तयार करणेबाबत यापूर्वी सूचना देण्यात आलेल्या आहेत. राज्यातील विविध भोगवटादार वर्ग-२ या सत्ता प्रकाराच्या जमिनींबाबत सुधारित गाव नमुना नं.१ क विहित करण्यात आला असून या नमुन्यात संपूर्ण जिल्ह्यातील गावनिहाय भोगवटादार वर्ग-२ च्या जमिनींची माहिती अद्ययावत करण्याच्या सूचना महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-लोआप्र. २००९/प्र.क्र.२३८/ल-६, दि.१७/०३/२०१२ अन्वये देण्यात आलेल्या आहेत. अशा "डाटा बँक" (Data Bank) च्या माहितीवरुन इनाम व वतन जमिनींच्या संदर्भात शर्तभंग तपासणी मोहीम हाती घेऊन प्रकरणपरत्वे नियमानुसार दंडाचे आदेश पारित करुन वसुली करण्यात यावी व अधिकार अभिलेख त्याअन्वये अद्ययावत करण्यात यावेत. तसेच राज्यातील देवस्थानांच्या जमिनींची तपासणी करुन त्या जमिनींच्या बेकायदेशीर हस्तांतरणाची प्रकरणे गुणवत्तेनुसार तपासून बेकायदेशीर हस्तांतरण आढळून आल्यास अशा जमिनींच्या अधिकार अभिलेखात पूर्ववत देवस्थानांच्या नावाची नोंद घेण्यात यावी. मा.उच्च न्यायालयाच्या Writ Petition No.२७५९/२०११, दिनांक २२ जानेवारी, २०२०

च्या आदेशाच्या अनुषंगाने बेकायदेशीर हस्तांतरणाबाबत कार्यवाही करावी. वर नमूद जमिनींची माहिती संकलित करुन भू-बंध (Geo-tagging) करुन Digital स्वरुपात साठवावी.

इनाम वतन जमिनीबाबत शर्तभंग तपासणी व कार्यवाही करणेची बाब महाराजस्व अभियानात समाविष्ठ करण्यात आली आहे. अमरावती विभागात इनाम व वतन जमीन नगण्य असल्याने तसेच भूदान व सिलिंग कायद्यांतर्गत वाटप झालेल्या जमिनी जास्त प्रमाणात असल्याने त्यामध्ये झालेले शर्तभंग तपासणी व अनुषंगिक कार्यवाही करणे आवश्यक आहे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-४ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(v) विविध प्रयोजनांसाठी शासकीय जमीन कब्जेहक्काने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या प्रकरणी पुढीलप्रमाणे कार्यवाही अभियान कालावधीत मोहिमेच्या स्वरुपात पूर्ण करण्यात यावी :-**

(१) दक्षता पथकामार्फत १००% तपासणी करुन घेऊन भाडेपट्टयाने / कब्जेहक्काने शासनाने प्रदान केलेल्या जमिनींच्या संदर्भात शर्तभंग झालेल्या प्रकरणांचा शोध घेण्यात यावा.

(२) अशा तपासणीअंती आढळणारी जी शर्तभंग प्रकरणे नियमानुकूल होणे शक्य आहे, अशी प्रकरणे संबंधित सक्षम प्राधिकरणाकडे सादर करण्यात यावीत. शर्तभंग झालेल्या ज्या प्रकरणांमध्ये क्षेत्रिय स्तरावर शर्तभंग नियमित करणे शक्य आहे, अशा सर्व प्रकरणांमध्ये जिल्हाधिकारी किंवा यथास्थिती विभागीय आयुक्त यांच्या पातळीवर निर्णय घेण्यात यावा. तसेच शर्तभंग झालेल्या ज्या प्रकरणांमध्ये शासनस्तरावरच असा शर्तभंग नियमानुकूल होणे अपेक्षित आहे, अशा सर्व प्रकरणांमध्ये परिपूर्ण प्रस्ताव शासनास पाठविण्यात यावा.

(३) भाडेपट्ट्याने / कब्जेहक्काने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींची अद्ययावत माहिती तयार करण्यात यावी. शासन परिपत्रक क्र. लेखाप-१०/२०११/प्र.क्र.१५९/ज-१, दि. ३ मार्च, २०१२ व शासन पत्र क्र. लेखाप-१०/२०११/प्र.क्र.१५९/ज-१, दि. ७ जून,२०१२ अन्वये विहित केलेल्या परिशिष्ट- “अ” व “ब” च्या नमुन्यामधील परिपूर्ण व अद्ययावत नोंदवहीतील माहिती जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

(४) शासन परिपत्रक क्र. जमीन-०८/२०१२/प्र.क्र.५१/ज-१, दि. २३.१०.२०१२ नुसार दिलेल्या निदेशाप्रमाणे महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ च्या नियम ४९ खालील नमुना-१८ मध्ये प्रदर्शित करावयाची प्रमाणपत्रे सर्व संबंधित मालमत्तांवर प्रदर्शित करण्याबाबत कार्यवाही पूर्ण करण्यात यावी.

(५) शासन परिपत्रक क्र. जमीन-०८/२०१२/प्र.क्र.४९/ज-१, दि.२६.११.२०१२ नुसार देण्यात आलेल्या निर्देशानुसार कब्जेहक्काने / भाडेपट्ट्याने जमीन प्रदानांचे सर्व शासन आदेश / ज्ञापने जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावेत.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-५(१), अ-५(२) व अ-५(३) मध्ये संकलित करण्यात यावी.)

(vi) <u>भाडेपट्ट्याने अथवा कब्जेहक्काने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीचे भोगवटादार वर्ग १-मध्ये रुपांतरण करणे :-</u>

भाडेपट्ट्याने अथवा कब्जेहक्काने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींपैकी कृषिक किंवा निवासी किंवा वाणिज्यिक किंवा औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या जमिनींचा धारणाधिकार भोगवटादार वर्ग-१ मध्ये रूपांतरित करण्याकरीता शासन राजपत्रात अंतिमत: प्रसिध्द केलेल्या अधिसूचना क्र.जमीन-२०१८/प्र.क्र.९०/ज-१,दि.०८.०३.२०१९ अन्वये अधिसूचित “महाराष्ट्र जमीन महसूल (भोगवटादार वर्ग-२ अथवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या जमिनी भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित करणे) नियम, २०१९ मधील तरतुदींनुसार संबंधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

भाडेपट्ट्याने अथवा कब्जेहक्काने प्रदान केलेल्या जमिनींची माहिती जिल्हाधिकारी कार्यालय तसेच तहसिल कार्यालयातील सरकारी जमीन प्रदान रजिस्टर मध्ये उपलब्ध आहे अशा जमिनींपैकी वरील अधिसूचनेनुसार भोगवटादार वर्ग-२ मधून भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित होणेस पात्र असलेल्या प्रकरणांची संख्या निश्चित करणेत यावी.

तद्नंतर त्या व्यक्तींना/संस्थांना/सहकारी गृहनिर्माण संस्थांना प्रस्तुत अधिसूचनेची लेखी माहिती देवून त्यांचे ताब्यातील जमीन भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरण करणेकामी अर्ज करणेबाबत कळविणेत यावे. यामध्ये अभियान सुरु करण्यापूर्वी अशी किती प्रकरणे तालुका/ उपविभाग व जिल्हानिहाय आहेत याची माहिती संकलित करुन संबंधित सर्व व्यक्ती/ संस्थांना यासंदर्भात लेखी माहिती देण्याचे व त्यापैकी किमान ५०% प्रकरणे निर्गत करण्याचे उद्दिष्ट ठेवावे.

विदर्भातील नागपूर व अमरावती विभागातील कब्जेहक्काने व भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या नझूल जमिनींचा धारणाधिकार-अ किंवा भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित करण्याबाबत निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. नझूल २०१६/प्र.क्र.१८६(ब) /ज-८,दिनांक २ मार्च, २०१९ ची प्रभावी अंमलबजावणी करणे :-

- भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित करण्यासाठी पात्र असणाऱ्या लाभार्थ्यांची यादी तयार करणे. त्यानंतर शहरी भागात शिबिरे आयोजित करुन प्रस्ताव तयार करणे.
- विहित रुपांतर अधिमूल्य भरण्यासाठी लाभार्थ्यांना नोटीस देणे व त्यानंतर पात्र प्रकरणांमध्ये भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरणाचे आदेश पारित करण्यासाठी प्रस्ताव जिल्हाधिकारी यांना सादर करणे.
- प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत ७ दिवसांचे आत आदेश पारित करणे. या कामाचा प्रत्येक मासिक बैठकीमध्ये आढावा घेणे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-६(१) व ६(२)</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(vii) <u>शासकीय जमिनींवरील भाडेपट्ट्यांच्या नुतनीकरणासाठी व भाडेपट्ट्यांच्या निष्पादनासाठी विशेष मोहीम राबविणे :-</u>

(अ) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक जमीन २५०५/प्र.क्र.४०५/ज-२, दि.१२.१२.२०१२ व समक्रमांकाच्या दि. ०५.०५.२०१८ च्या शासन निर्णयाप्रमाणे बृहन्मुंबईतील शासकीय जमिनींच्या भाडेपट्ट्यांच्या नुतनीकरणाविषयक धोरणाप्रमाणे शासकीय जमिनीवरील संपुष्टात आलेल्या भाडेपट्ट्यांचे नुतनीकरण करण्याची विशेष मोहीम राबविण्यात यावी. ही

कार्यवाही करीत असताना त्यामधील शर्तभंगावर नियमानुसार दंडात्मक कार्यवाही करुन दंडाची वसुली करण्यात यावी.

(ब) नागपूर व अमरावती विभागातील तत्कालिन मध्य प्रदेश शासन किंवा सी.पी.अँड बेरार जमीन महसूल अधिनियमांन्वये शासनाने निवासी, वाणिज्यिक आणि औद्योगिक प्रयोजनासाठी भाडेपट्ट्याने दिलेल्या नझूल जमिनींच्या भाडेपट्ट्यांचे नुतनीकरण करणे, शर्तभंग नियमित करणे व अन्य बाबींच्या अनुषंगाने सुधारित धोरण शासन निर्णय क्र. जमीन-२४९९/प्र.क्र.१२५/ज-८, दिनांक २३.१२.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आले आहे. त्यानुषंगाने भाडेपट्टा संपुष्टात आलेल्या प्रकरणांत नझूल जमिनींच्या भाडेपट्ट्यांचे नुतनीकरण करावयाची कार्यवाही मोहीम घेऊन पूर्ण करण्यात यावी. तसेच सर्व शर्तभंग प्रकरणांत उक्त शासन निर्णयातील तरतुदींप्रमाणे कार्यवाही पूर्ण करण्यात यावी.

(क) उर्वरित महाराष्ट्रातील शासकीय जमिनींच्या संपुष्टात आलेल्या भाडेपट्ट्यांचा आढावा घेण्यात यावा आणि या भाडेपट्ट्यांच्या बाबतीत शर्तभंग झाला असल्यास त्याबाबतीत नियमानुसार दंडात्मक कार्यवाही करुन दंडाची वसुली करण्यात यावी व शासनाच्या प्रचलित आदेशानुसार भाडेपट्ट्यांच्या नुतनीकरणाविषयी कार्यवाही करण्यात यावी.

(ड) संपूर्ण राज्यात भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या बाबतीत ज्या प्रकरणात अद्याप भाडेपट्ट्यांचे निष्पादन झालेले नाही, त्याप्रकरणी भाडेपट्ट्यांचे निष्पादन करण्याची कार्यवाही मोहीम घेऊन पूर्ण करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-७ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(viii) अर्धन्यायिक प्रकरणांचा निपटारा करणे :-

शासन निर्णय क्रमांक एस-३०/२०१५/प्र.क्र.२९९/ज-१,दिनांक १७.१२.२०१५ अन्वये महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि त्याखालील नियमातील तरतुदीअन्वये प्राप्त होणारी अपिले किंवा पुनरीक्षण /पुनर्विलोकन अर्ज विषयक कामकाज हाताळताना अवलंबवयाच्या कार्यपध्दती विषयी सर्व संबंधितांना सर्वसमावेशक निर्देश देण्यात आलेले आहेत. अर्धन्यायिक प्रकरणे हाताळताना e-DISNIC/eqjcourts प्रणालीचा वापर अनिवार्य असून त्यासंदर्भात खालील बाबींची दक्षता घेण्यात यावी.

१) अर्धन्यायिक प्रकरणांचा निपटारा विहित कालमर्यादेत होण्याच्या दृष्टीने सदर प्रणालीवर सर्व संबंधित महसूल अधिकाऱ्यांनी माहिती भरुन सदर प्रणालीचा वापर करणे बंधनकारक आहे.
२) सदर प्रणालीत प्रकरणनिहाय सर्व्हे नंबर / गट नंबरची माहिती भरणे अनिवार्य आहे.
३) ज्या प्राधिका-यांकडे अर्धन्यायिक प्रकरणांची संख्या जास्त आहे, त्याठिकाणी कलम २२५ व २२६ अन्वये आवश्यकतेनुसार इतर प्राधिका-यांकडे जलद निपटा-यासाठी प्रकरणांचे वाटप करण्यात यावे. सदरची जबाबदारी ही जिल्हाधिका-यांची राहील.
४) कलम २५५ व २५७ मधील तरतुदींनुसार विहित मुदतीत निर्णित न झालेल्या प्रकरणांच्या बाबतीत सक्षम प्राधिका-यांकडून वेळेत मुदतवाढ प्राप्त करुन घ्यावी.
५) ई-फायलिग.

६) जिल्हा निहाय प्रकरणात करावयाच्या कार्यवाही व विधी विषयक मास्टर ट्रेनर तयार करणे व त्यांचे मार्फत जिल्हा स्तरावर प्रशिक्षण देणे.

७) क्षेत्रिय स्तरावरील पिठासीन अधिकारी यांचे जिल्हानिहाय प्रशिक्षण आयोजित करणे.

८) प्रशिक्षणानंतर सहा महिन्यांचे कालावधीपर्यंत करण्यात येत असलेल्या अर्धन्यायिक कामकाजाचा मासिक आढावा/मागोवा घेणे.

९) सहा महिन्यानंतर पिठासीन अधिकारी यांना क्षेत्रिय स्तरावर येणाऱ्या अडचणी संदर्भात व इतर अनुषंगिक बाबीसंबधी उजळणी प्रशिक्षण घेणे व सहा महिन्यांचे काळात झालेल्या कामकाजाचा आढावा घेणे.

१०) प्रकरणे विहित कालमर्यादेत निकाली काढले जातील यादृष्टीने आढावा घेणे. प्रलंबित प्रकरणांची संख्या कमी करणे व पर्यायाने महसूली प्रकरणांची संख्या कमी करणे.

११) सद्य:स्थितीत विविध महसूली न्यायालयांमध्ये प्रत्यक्ष हजर राहून अथवा टपालाद्वारे प्रकरण/ अपील/रिव्हीजन इ.दाखल करण्याची पध्दत अस्तित्त्वात आहे. परंतु बऱ्याच वेळा अशी प्रकरणे विनाकार्यवाही तशीच पडून राहत असल्याचे व त्यामध्ये किमान नोटीसा सुध्दा निघत नसल्याचे शासनाच्या निर्दशनास आले आहे. ते टाळण्यासाठी व आधुनिक तंत्रज्ञानाचा न्यायालयीन कामकाजामध्ये वापर वाढवा या उद्देशाने E-filing ही संकल्पना राबविण्याचे शासनाने ठरविले आहे. यासाठी पक्षकारांना /विधिज्ञांना Scrutiny Sheet (तपासणी सूची) उपलब्ध करुन देऊन NIC च्या मदतीने सर्व महसूली न्यायालयांसाठी E-filing ची सुविधा उपलब्ध करुन द्यावी. जेणेकरुन अर्धन्यायिक प्रकरण कधी प्राप्त झाले व त्याचा निपटारा कधी झाला ही बाब स्पष्ट होईल. सेतू/ आपले सरकार केंद्रांमध्ये नागरिकांसाठी कागदपत्रांचे Scanning व E-filing ची सुविधा उपलब्ध करुन देण्यात यावी. त्याचबरोबर Online Gateway ही उपलब्ध करुन द्यावा.

१२) शासनाच्या असे निदर्शनास आले आहे कि, विविध वरिष्ठ न्यायालयांमध्ये खालील न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या संचिका (Record and Proceeding/LC Papers) वेळेत प्राप्त होत नसल्यामुळे न्यायदानाच्या कामामध्ये विलंब होत आहे. याबाबतीत सर्व वरिष्ठ न्यायालयांनी त्यांना हव्या असलेल्या प्रकरणांची (R & P) यादी अभियान कालावधीतील प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत तयार करावी व त्याप्रमाणे सर्व संबंधित खालील न्यायालयांनी यादीप्रमाणे सर्व R & P संबंधित वरिष्ठ न्यायालयास त्या महिन्याच्या २५ तारखेपर्यंत खास दुतामार्फत सादर करावीत. अभियान कालावधीत एकही प्रकरण प्रलंबित राहणार नाही याची दक्षता घ्यावी. यासाठी अभिलेख Scanning ची सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

(वरील निर्देशांच्या अनुषंगाने अपिले व पुनरीक्षण/पुनर्विलोकन अर्जांवर केलेल्या कार्यवाहीबाबतची माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-८(१) व ८(२)</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(ix) <u>एक महिन्याच्यावर प्रलंबित असलेले फेरफार निकाली काढणे व त्याकरिता मंडळ मुख्यालयी फेरफार अदालत घेणे :-</u>**

a) सर्व प्रथम तहसिल स्तरावर मंडळनिहाय एक महिन्याचे वर प्रलंबित असलेल्या साध्या व विवादग्रस्त फेरफारांची संख्या निश्चित करण्यात यावी. सदरची संख्या निश्चित करत असताना Online MIS प्रणालीचा वापर करावा. तलाठी व मंडळ अधिकारी यांचे login द्वारे

महसूल नायब तहसिलदार (DBA) यांनी तपासणी करुन प्रलंबित फेरफारांची संख्या व फेरफरांची प्रलंबित स्थिती निश्चित करावी. यासाठी तलाठी दैनंदिनी ब बारनिशी (Talathi Diary & Worksheet) ऑनलाईन करणेत यावी. जेणेकरुन प्रलंबित फेरफारांची निश्चिती अचूकपणे करता येईल.

b) "फेरफार अदालत" तहसिलदार स्तरावर आयोजित करणेत यावी व याबाबत व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

c) आवश्यकतेनुसार फेरफार अदालत मंडळ स्तरावर आयोजित करणेकामी संबंधित जिल्हाधिकारी निर्णय घेतील.

d) फेरफार अदालतीचे आयोजन दर महिन्याचे दुसऱ्या बुधवारी करणेत यावे.

e) फेरफार अदालतीच्या दिवशी प्रलंबित फेरफार नोंदीच्या संदर्भात अर्जदार व हरकतदार यांना आवश्यक त्या पुराव्यांसह उपस्थित राहण्याबाबत नोटीस बजाविण्यात यावी.

f) सदर प्रलंबित फेरफार उपलब्ध अभिलेखावरुन नियमानुसार असल्याचे निष्पन्न होत असल्यास त्याच दिवशी प्रमाणित करण्यात यावेत.

g) एप्रिल २०१६ पासून Online ई-फेरफार ही सुविधा प्रत्येक गावात उपलब्ध करुन दिली आहे. मात्र तांत्रिक अडचणींमुळे काही नोंदणीकृत skip पर्याय वापरुन झालेले आहेत. अशा फेरफारांची नोंद घेणेकामी तसेच त्यापूर्वीच्या काळातील प्रलंबित फेरफारांची नोंद घेणेकामी मागील १० वर्षातील प्रलंबित "अ" पत्रकांचा आढावा घेऊन त्यासंबंधीच्या फेरफार नोंदी पूर्ण करण्यात याव्यात.

h) दरमहा ३० तारखेला संबंधित मंडल स्तरावर मुदत पूर्ण झालेले प्रलंबित फेरफार प्रकरण नाही असे प्रमाणपत्र घेण्यात यावे. उक्त प्रमाणपत्रामध्ये कार्यवाही पूर्ण करण्याची अंतिम तारखेचा समावेश करणेत यावा.

i) जिल्हाधिकारी/ उपविभागीय अधिकारी व तहसिलदार या कार्यवाहीस व्यापक प्रसिध्दी देतील.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-९ मध्ये संकलित करण्यात यावी.)

## (x) भूसंपादन केलेल्या प्रकरणी कमी जास्त पत्रके तयार करुन गाव दप्तर अद्ययावत करणे :-

खाजगी जमिनींचे भूसंपादन झाल्यानंतरही प्रत्यक्षात कमीजास्त पत्रक तयार करुन गाव दप्तरातील सर्व नोंदी अद्ययावत न केल्यामुळे गाव दप्तरात मूळ मालकांची नावे तशीच रहात असल्याचे व काही प्रकरणात त्यातून कायदेशीर गुंतागुंत निर्माण झाल्याचे निदर्शनास आले आहे. हे टाळण्यासाठी जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य यांनी दिनांक ५.१२.२०१२ रोजी कमीजास्त पत्रक अंमलबजावणी कामी परिपत्रक काढले आहे. मात्र त्याप्रमाणे कार्यवाही झाली नसल्याचे निदर्शनास आले आहे.

सबब या अभियान कालावधीत सर्व जिल्हाधिकारी ब्रिटीश कालावधीपासून सर्व शासकीय, निमशासकीय, सार्वजनिक प्रयोजनासाठी व प्रकल्पग्रस्तांचे पुनर्वसनासाठी करणेत आलेले निवाडे जाहीर झाल्यापर्यंतची कार्यवाही पूर्ण झालेल्या परंतु कमीजास्त पत्रके न झालेल्या भूसंपादन प्रस्तावांची यादी सर्व भूमी संपादन अधिका-यांकडून सोबतच्या परिशिष्ट- १ मधील नमुना नोंदवही मध्ये तयार करणेत यावी. बंद व स्थलांतरित भूसंपादन कार्यालयांच्या बाबतीत ते कार्यालय ज्या

कार्यालयामध्ये समाविष्ट झालेले आहे अशा कार्यालयांनी यादी तयार करावी. सदर यादीसह कमीजास्त पत्रके तयार करणेसाठी खालील नमूद कागदपत्रांसह सदरचे प्रस्ताव जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख यांचेकडे पाठवावीत.

१. संयुक्त मोजणी नकाशा व संयुक्त मोजणी पत्रक
२. भूसंपादन कायदा कलम ६ चे नोटीफिकेशन
३. अंतिम जाहीर निवाड्याची प्रत
४. भूमी संपादीत जमिनीची ताबे पावतीची नक्कल
५. शेतसारा कमी करणेबाबतचे आदेश
६. जर काही जमिनींचे सर्व्हे नंबर किंवा अन्य क्षेत्र वर्ग करावे लागत असल्यास तसे जमीन वर्ग केले बाबतचे जिल्हाधिकारी यांचे अभिहस्तांतरीत आदेश
७. भूसंपादन समन्वय अधिका-यांनी भूसंपादन अधिका-यांकडील प्रपत्र क्र.१०.१ प्रमाणे माहिती तयार करुन प्रपत्र क्र. १०.१ अ प्रमाणे माहिती जिल्हाधिका-यांना सादर करावी व त्याची एक प्रत जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख यांना पाठवावी.
८. जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी कमीजास्त पत्रके करणेसाठी प्रकरणांची नोंदवही तालुका निहाय प्रपत्र क्र.१०.२ प्रमाणे तयार करुन त्यामध्ये प्राप्त प्रकरणांची नोंद घेऊन सदरची प्रकरणे संबंधित उप अधीक्षक यांचेकडे कमीजास्त पत्रके तयार करण्यासाठी पाठवावीत.
९. उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी सदरची प्रकरणे प्राप्त होताच प्रपत्र क्र.१०.३ प्रमाणे नोंदवही तयार करुन त्यामध्ये नोंदी घेऊन, दुरुस्ती / कमीजास्त पत्रके नोंदवही व आकारबंद यावरुन सर्व प्रकरणांमध्ये कमीजास्त पत्रक झाले आहे काय याबाबत खात्री करावी आणि कमीजास्त पत्रक झाले नसल्यास दुरुस्ती नोंदवहीस नोंद घेऊन त्वरित कमी जास्त पत्रके करण्याची कार्यवाही पूर्ण करावी.
१०.उप अधीक्षक, भूमि अभिलेख कार्यालयाने करावयाची कार्यवाही:- उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी कमीजास्त पत्रक करताना खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

* अंतिम जाहीर निवाड्यात व संयुक्त मोजणी नकाशे, संयुक्त मोजणी पत्रके यामध्ये नमूद केलेले गावाचे नाव, सर्व्हे नंबर / गट नंबर, क्षेत्र एकच असलेबाबत खात्री करुन कमी जास्त पत्रक तयार करावे.
* सरकारी जमिनी संपादीत झालेल्या असतील तर जिल्हाधिकारी यांचेकडील अभिहस्तांकित आदेश प्राप्त करुन घेऊनच कमीजास्त पत्रक करावे.
* संपादीत क्षेत्रापैकी लागण क्षेत्र व पोटखराब क्षेत्र किती आहे हे काळजीपूर्वक पाहून त्याप्रमाणे तेरजेमधील प्रकारवार दुरुस्ती बरोबर झाली आहे काय याबाबत खात्री करावी.
* कमी जास्त पत्रकामध्ये अंतिम जाहीर निवाड्याचा क्रमांक व दिनांक अचूक दाखल करणेत आला आहे काय याची खात्री करावी.
* गाव नकाशाच्या दोन प्रती घेण्यात येऊन त्या “अ” व “ब” अभिलेखात ठेवून त्यामध्ये कमीजास्त पत्रकामधील सर्व दुरुस्तींचा अंमल घेण्यात यावा व तसा गाव नकाशांवर शेरा ठेवणेत यावा.
* नकाशा दुरुस्ती करताना योग्य स्केल मध्ये आहे काय याची खात्री करावी.
* कमीजास्त पत्रकाची एक प्रत गावचे आकारबंदास ठेवलेबाबत व आकारबंदास संबंधित सर्व्हे नंबर / गट नंबर यास शेरे ठेवले आहेत काय याची खात्री करावी.

* आकारबंदामधील “क” फॉर्म मध्ये कमीजास्त पत्रकाप्रमाणे दुरुस्ती करावी व त्या दुरुस्ती समोर उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी अदयाक्षरी करावी.

११. उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी कमीजास्त पत्रक मंजूर करुन गाव नमुना नंबर ७/१२ सदरी अंमल घेणेकामी संबंधित तहसिलदार यांचेकडे पाठवावे व त्याचा अंमल गाव नमुना नंबर ७/१२ सदरी झाल्याबाबतचे अद्ययावत केलेले गाव नमुना नंबर ७/१२ उतारे व घेण्यात आलेला फेरफाराची प्रत संबंधित गाव कामगार तलाठी / तहसिलदार यांचेकडून प्राप्त करुन घ्यावी आणि दरमहा प्रपत्र क्र. १०.४ मधील नमुन्यात माहिती जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख यांचेकडे सादर करावी.

१२. संबंधित तहसिलदार यांनी कमीजास्त पत्रके प्राप्त होताच ७/१२ सदरी त्वरित गाव कामगार तलाठी यांचे मार्फत अंमल घ्यावा व त्याबाबत अद्ययावत केलेले गाव नमुना नंबर ७/१२ उतारे व घेण्यात आलेल्या फेरफाराच्या प्रती उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांचेकडे पाठविणेत याव्यात.

१३. जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी माहिती प्राप्त झाल्यानंतर प्रपत्र क्र. १०.५ मधील नमुन्यात संकलित करुन जिल्हाधिकारी यांना सादर करावी व त्याची एक प्रत उप संचालक, भूमि अभिलेख यांचे मार्फत जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख यांचेकडे सादर करावी.

१४.जिल्हाधिकारी यांनी त्यांचेकडील दरमहाचे महसूल बैठकीमध्ये प्रपत्र क्र.१०.५ मधील माहिती वरुन कमीजास्त पत्रकाची कार्यवाही संबंधित उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांचेकडून पूर्ण झाली आहे काय, तसेच तयार झालेल्या कमी जास्त पत्रकाचा गाव नमुना नंबर ७/१२ सदरी अंमल संबंधित तहसिलदार यांनी घेतला आहे काय याचा आढावा घ्यावा.

१५. गाव कामगार तलाठी यांनी करावयाची कार्यवाही:- गाव कामगार तलाठी यांनी कमीजास्त पत्रकाचा अंमल घेताना खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

- मंजूर कमीजास्त पत्रकाप्रमाणे फेरफार नोंद घेऊन सदर नोंद मंजूर करुन घ्यावी व मंजूर नोंदी प्रमाणे गाव नमुना नंबर ७/१२ सदरी अंमल दयावा.
- अद्ययावत केलेला गाव नमुना नंबर ७/१२ उतारा फेरफार उता-यासह तहसिलदार यांचेकडे सादर करावा.
- कमीजास्त पत्रकासोबतच्या गाव नकाशाच्या ट्रेसिंग प्रमाणे त्यांचेकडील गाव नकाशाच्या प्रतीमध्ये दुरुस्ती करावी.
- कमीजास्त पत्रक ट्रेसिंगसह गावच्या आकारबंदास जोडावे.
- आकारबंदास संबंधित सर्व्हे नंबर / गट नंबर यांस शेरे ठेवावेत.

१६. जिल्ह्यातील सर्व उपविभागीय अधिकारी, तहसिलदार, जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख व उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांनी तलाठी दप्तर तपासणीवेळी आकारबंदास कमी जास्त पत्रक ठेवले आहे काय व गाव नमुना नंबर ७/१२ मध्ये कमी जास्त पत्रकाप्रमाणे अंमल घेण्यात आला आहे काय याबाबत तपासणी करुन गाव नमुना नंबर ७/१२ वर अंमल घेण्याचे शिल्लक राहिले असल्यास, तात्काळ अंमल करुन घेणेची कार्यवाही करावी.

१७. तसेच यापुढे सर्व भूमी संपादन प्रकरणांमध्ये अंतिम निवाडा जाहीर होताच सर्व संबंधितांनी उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करुन कमीजास्त पत्रके तयार करुन त्याचा अंमल गावचे दप्तरामध्ये घेण्याची दक्षता घ्यावी.

१८. अभियान कालावधीच्या पूर्वी तालुकानिहाय अशी कमीजास्त पत्रके करणेवर प्रलंबित प्रकरणांची संख्या निश्चित करावी व अभियान कालावधी नंतर त्या दिनांकापर्यंतचे असे कमीजास्त पत्रके शिल्लक राहिले नाहीत असे प्रमाणित करावे.
(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१०, १०.१, १०.१(अ), १०.२, १०.३, १०.४ व १०.५ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xi) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२ (ब) च्या अनुषंगाने पुढाकाराने कार्यवाही करणे :-

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मध्ये महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३०/२०१७ अन्वये समाविष्ट कलम४२-ब मधील तरतुदींनुसार जिल्ह्यातील अंतिम विकास योजना मंजूर झालेल्या नागरी क्षेत्रामधील जमिनींच्या संदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी स्वत:हून आढावा घेऊन अंतिम विकास योजनेमध्ये जमीन वापराबाबत जो वापर विभाग दर्शविण्यात आला आहे, त्या-त्या वापरास संबंधित जमिनीचे अकृषिक वापरासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील **कलम ४२ (ब)** अन्वये मानीव रुपांतरण होण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे रकमा निश्चित करुन सदर रकमांचा भरणा शासनाकडे करण्याबाबत संबंधित भूधारकांना कळविण्याची व्यवस्था करावी. :-

(i) संबंधित जमिनीच्या अकृषिक वापराच्या संदर्भात महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ४७ (अ) खाली रुपांतरण कर आणि नियमांनुसार अकृषिक आकार.
(ii) या व्यतिरिक्त भोगवटदार **वर्ग-दोन** म्हणून धारण केलेल्या जमिनीच्या बाबतीत लागू असेल त्याप्रमाणे नजराणा किंवा अधिमूल्य आणि इतर शासकीय देणी.

वरीलप्रमाणे रकमा निश्चित करुन सदर रकमांचा भरणा शासनाकडे करण्याबाबत संबंधित भोगवटादारास कळविण्याची कार्यवाही मोहिमेच्या स्वरुपात जिल्हाधिकाऱ्याने करावी. ज्या दिनाकांस संबंधित भोगवटादार सदरहू रक्कम शासनाकडे अदा करेल, त्या दिनांकापासून संबंधित जमीन ही विकास आराखडयानुसार दर्शविण्यात आलेल्या वापर विभागातील प्रयोजनाकरीता अकृषिक वापरात रुपांतरित झाली असल्याचे मानण्यात येईल. तसेच सदरहू जमिनीच्या अकृषिक वापरासाठी स्वतंत्ररित्या अकृषिक परवानगीची आवश्यकता राहणार नाही, याची स्पष्ट कल्पना संबंधित भूधारकास त्यावेळी देण्यात यावी. तसेच संबंधित भोगवटादाराने विहित रकमांचा भरणा शासनाकडे केल्यास संबंधित जमिनीच्या अधिकार अभिलेखात जमीन अकृषिक झाल्यासंबंधी नोंद घेण्यात यावी आणि त्याअनुषंगाने विहित रक्कम शासनाकडे भरणा केल्याच्या दिनांकापासून २ महिन्याचे आत संबंधितांना सनद देण्याबाबतही कार्यवाही करण्यात यावी. अशा किती सनदा प्राप्त करून घेण्याबाबत अर्ज प्राप्त झाले होते व किती निकाली काढले हे स्पष्ट करावे. त्यानुषंगाने विहित कालमर्यादेत संबंधितांना सनद देण्याबाबतही कार्यवाही करण्यात यावी.
(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-११ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xii) महाराष्ट्र जमीन महसूल, १९६६ च्या कलम ४२-क अनुषंगाने पुढाकाराने कार्यवाही करणे:-

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,१९६६ मध्ये महाराष्ट्र अधिनियम क्र.३०/२०१७ अन्वये समाविष्ठ कलम ४२ (क) मधील तरतुदीनुसार जिल्ह्यातील अंतिम प्रादेशिक योजना मंजूर झालेली

असेल, अशा जमिनीच्या संदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी आढावा घेऊन अंतिम प्रादेशिक योजनेमध्ये जमीन वापराबाबत जो वापर विभाग दर्शविण्यात आला आहे, त्या त्या वापरास संबंधित जमिनीचे अकृषिक वापरासाठी नागरी क्षेत्रामधील जमिनीच्या संदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांनी स्वत:हून आढावा घेऊन अंतिम विकास योजनेमध्ये जमीन वापराबाबत जो वापर विभाग दर्शविण्यात आला आहे, त्या-त्या वापरास संबंधित जमिनीचे अकृषिक वापरासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ४२ (क) अन्वये मानीव रुपांतरण होण्याच्या दृष्टीने शासनाकडे पुढील प्रमाणे रकमा निश्चित करुन सदर रकमांचा भरणा शासनाकडे करण्याबाबत संबंधित भूधारकांना कळविण्याची व्यवस्था करावी.

(i) संबंधित जमिनीच्या अकृषिक वापराच्या संदर्भात महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ४७ अ खाली रुपांतरण कर आणि नियमानुसार अकृषिक आकार.

(ii) या व्यतिरिक्त भोगवटादार वर्ग-२ म्हणून धारण केलेल्या जमिनीच्या बाबतीत लागू असेल त्याप्रमाणे नजराणा किंवा अधिमूल्य आणि इतर शासकीय देणी.

वरीलप्रमाणे रकमा निश्चित करुन सदर रकमांचा भरणा शासनाकडे करण्याबाबत संबंधित भोगवटादारास कळविण्याची कार्यवाही मोहिमेच्या स्वरुपात जिल्हाधिकाऱ्याने करावी. ज्या दिनांकास संबंधित भोगवटादार सदरहू रक्कम शासनाकडे अदा करेल, त्या दिनांकापासून संबंधित जमीन ही अंतिम प्रादेशिक योजनेनुसार दर्शविण्यात आलेल्या वापर विभागातील प्रयोजनाकरीता अकृषिक वापरात रुपांतरित झाली असल्याचे मानण्यात येईल. तसेच सदरहू जमिनीच्या अकृषिक वापरासाठी स्वतंत्ररित्या अकृषिक परवानगीची आवश्यकता राहणार नाही, याची स्पष्ट कल्पना संबंधित भूधारकास त्यावेळी देण्यात यावी. तसेच संबंधित भोगवटादाराने विहित रकमांचा भरणा शासनाकडे केल्यास संबंधित जमिनीच्या अधिकार अभिलेखात जमीन अकृषिक झाल्यासंबंधी नोंद घेण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल- प्रपत्र अ-१२ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xiii) <u>महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२ (ड) च्या अनुषंगाने पुढाकाराने कार्यवाही करणे :-</u>

महाराष्ट्र अधिनियम क्र. १२/२०१८ अन्वये महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मध्ये नव्याने समाविष्ठ करण्यात आलेल्या कलम ४२ (ड) नुसार कोणत्याही गावठाणाच्या कलम १२२ खालील घोषित हद्दीपासून २०० मीटरच्या परिघीय क्षेत्रातील जमिनींच्या अकृषिक रुपांतरणाबाबतची खालीलप्रमाणे तरतूद करण्यात आली आहे:-

*“(एक) कोणत्याही गावाचे ठिकाण, यांच्या हद्दीपासून २०० मीटर च्या आत स्थित क्षेत्रात किंवा,*

*(दोन) नगर किंवा शहर, यांच्या हद्दीपासून २०० मीटर च्या आतील परंतु प्रारुप किंवा अंतिम प्रादेशिक योजनेमध्ये विकासयोग्य झोन करिता वाटप केलेल्या क्षेत्रात;*

*(ज्याचा निर्देश “परिघीय क्षेत्र” असा करण्यात आला आहे.) स्थित असलेली कोणतीही जमीन, अशा क्षेत्राला लागू असलेल्या विकास नियंत्रण विनियमांच्या तरतुदींना अधीन राहून, निवासी*

*प्रयोजनासाठी किंवा प्रारुप किंवा अंतिम प्रादेशिक योजनेनुसार अनुज्ञेय प्रयोजनासाठी अकृषिक वापरात रुपांतरित केली असल्याचे मानण्यात येईल."*

अशा परिघीय क्षेत्रामध्ये स्थित असलेल्या जमिनीच्या मानीव अकृषिक रुपांतरणासाठी संबंधित जिल्हाधिकारी यांनी अशा जमिनींसंदर्भातील माहिती स्वतःहून किंवा याबाबतीत संबंधितांनी केलेल्या अर्जावरुन संकलित करावी व संबंधित जमिनीचा भोगवटादार कोण आहे, धारणाधिकार कोणता आहे, तसेच सदर जमिनीच्या रुपांतरणाबद्दल महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४७(अ) मधील तरतुदींन्वये देय असलेला रुपांतरण कर, अकृषिक आकारणी तसेच यथास्थिती जमीन वर्ग-२ धारणाधिकाराची असल्यास, नजराणा किंवा अधिमूल्य आणि इतर शासकीय देणी किती आहेत, सदर रकमा संबंधित व्यक्तीने शासनाकडे कोणत्या लेखाशिर्षाखाली भरणे आवश्यक आहे, याबाबतची माहिती संबंधित भोगवटादारास अविलंब कळविण्याची कार्यवाही मोहीम स्वरुपात करण्यात यावी.

संबंधित व्यक्तीने शासनास महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२(ड) अन्वये जमिनीच्या मानीव अकृषिक रुपांतरणापोटी देय उक्त रकमा विहित लेखाशिर्षाखाली जमा केल्यानंतर सदर जमीन ही महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२(ड) मधील तरतुदींन्वये अकृषिक वापरात रुपांतरित झाली असल्याचे समजण्यात येईल.

शासनास देय रकमा विहित लेखाशिर्षाखाली भरल्यासंदर्भातील चलनांची प्रत,जिल्हाधिकाऱ्यांनी संबंधित गावाच्या तलाठी यांच्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. सदर चलनाच्या प्रतीच्या आधारे संबंधित जमीन ही अकृषिक झाल्याची नोंद अधिकार अभिलेखात घेण्यासंदर्भात फेरफार नोंदविण्याची कार्यवाही तलाठ्यांनी ७ दिवसांच्या आत करावी व अशी फेरफार नोंद विनाविलंब प्रमाणित करण्याची कार्यवाही करावी. याप्रमाणे जमीन अकृषिक झाल्यानंतर महाराष्ट्र धारण जमिनींचे तुकडे पाडण्यास प्रतिबंध करण्याबाबत व त्यांचे एकत्रीकरण करण्याबाबत अधिनियम मधील तुकडेबंदी विषयक तरतुदी अशा जमिनीला लागू राहणार नाही.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१३ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xiv) कब्जेहक्काने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीवरील इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देणे :-**

कब्जेहक्काने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीचा वापर विहित मुदतीत करण्यात आला किंवा कसे याचा प्रकरणनिहाय आढावा घेण्यात यावा व त्यानुषंगाने महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ मधील तरतुदींनुसार किंवा तत्पुर्वी विविध व्यक्ती, संस्था आणि कंपनी यांना विविध प्रयोजनार्थ कब्जेहक्काने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीवरील इमारत बांधकामासाठी मुदतवाढ देण्याबाबत शासन निर्णय क्र.जमीन-२०१६/प्र.क्र.२५४/ज-१, दि.०१.०३.२०१९ अन्वये दिलेल्या धोरणात्मक निर्देशान्वये बांधकाम मुदतवाढ प्रलंबित असलेल्या प्रकरणांत मोहिमेच्या स्वरुपात कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१४ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xv) <u>क्रीडांगण /खेळाचे मैदान/ व्यायामशाळा प्रयोजनार्थ प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींचे भाडेपट्टा नुतनीकरण करणे :-</u>

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ मधील तरतुदींनुसार किंवा अन्यथा, क्रीडांगण किंवा खेळाचे मैदान, व्यायामशाळा यांच्या उभारणी/निर्मितीसाठी रु.१/- या दराने वार्षिक नाममात्र भुईभाडे आकारुन अथवा सवलतीच्या दराने भुईभाडे आकारून भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या भाडेपट्ट्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर, अशा जमिनींच्या भाडेपट्ट्यांचे नुतनीकरण करण्याबाबत शासन निर्णय क्र.जमीन-२०१८/प्र.क्र.९१/ज-१, दि.१६.११.२०१८मधील तरतुदींनुसार मोहिमेच्या स्वरुपात कार्यवाही संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावी. तसेच ज्या प्रकरणात संबंधित पट्टाधारक संस्थेने शर्तभंग केलेला असेल अशी प्रकरणे शासन मान्यतेस्तव सादर करण्यात यावीत.
(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्रअ-१५</u>मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xvi) <u>भारत/पाकिस्तान फाळणीच्या वेळी पश्चिम पाकिस्तानातून आलेल्या निर्वासितांना-विस्थापितांना भरपाई संकोष मालमत्ता (Compensation Pool Properties) मधून देण्यात आलेल्या जमिनींच्या धारणाधिकाराचे सर्वेक्षण करुन पुनर्विलोकन करणे :-</u>

भारत पाकिस्तान फाळणीच्या वेळी पश्चिम पाकिस्तानातून आलेल्या निर्वासितांना/ विस्थापितांना “निर्वासित इसम (नुकसान भरपाई व पुनर्वसन) अधिनियम, १९५४” व त्या अंतर्गत तयार केलेल्या नियमांचे आधारे भरपाई संकोष मालमत्तेमधून (Compensation Pool Properties) दिलेल्या अथवा अशा मालमत्तेवरील अतिक्रमण नियमानुकूल करुन दिलेल्या मिळकती, यांच्या धारणाधिकाराचे स्वत:हून सर्वेक्षण करून पुनर्विलोकन करण्यासंदर्भात क्षेत्रिय महसूली अधिकारी व प्राधिकारी यांनी शासन परिपत्रक क्र.जमीन-२०१५/प्र.क्र.२४०/ज-१, दि.१४.६.२०१८ अन्वये दिशानिर्देश देण्यात आले असून सदर परिपत्रकामधील तरतुदींनुसार मोहिमेच्या स्वरुपात कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१६</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xvii) <u>गाव नकाशाप्रमाणे अतिक्रमित व बंद झालेले गाडी रस्ते / पाणंद / पांधण / शेतरस्ते / शिवाररस्ते / शेतावर जाण्याचे पायमार्ग मोकळे करणे :-</u>

शेतक-यांना त्यांच्या शेतावर जाण्यासाठी व शेतातील माल वाहतुक करण्यासाठी अतिक्रमण मुक्त रस्ते अत्यावश्यक आहेत. त्यासाठी गाव नकाशाप्रमाणे अतिक्रमित व बंद झालेले गाडी रस्ते / पाणंद/ पांधण/ शेत रस्ते/ शिवार रस्ते /शेतावर जाण्याचे पायमार्ग व शिव रस्ते लोकसहभागाव्दारे मोकळे करणे यासाठी सर्व जिल्हयात विशेष मोहीम राबविण्यात यावी. याकरिता पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरण्यात यावी:-

- सर्व प्रथम संबधित तलाठी यांचेमार्फत गावातील एकूण पाणंद/पांधण/शेत रस्ते/शिवार रस्ते/गाडी रस्ते शेतावर जाण्याचे पायमार्ग व शिव रस्ते अशा रस्त्यांबाबत माहिती संकलित करण्यात यावी. त्यापैकी अतिक्रमित व बंद झालेल्या रस्त्यांची माहिती संकलित करावी व ही सर्व माहिती Geo-tag करुन Soft व Digital स्वरुपात साठवावी.

- ❖ वरीलप्रमाणे रस्त्यांची संकलित केलेली माहिती सर्व गावक-यांना मिळावी याकरिता सदर रस्त्यांची माहिती ग्रामपंचायत / चावडीमध्ये गाव नकाशात दर्शवून तेथे दर्शनी भागात लावण्यात यावी. तसेच ही सर्व माहिती जिल्हाधिकारी कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करावी.
- ❖ त्यानंतर सर्वप्रथम अतिक्रमित व बंद झालेले रस्ते लोक सहभागातून मोकळे करण्याची कार्यवाही करण्यात यावी.
- ❖ त्यांनतर अतिक्रमणामुळे बंद झालेले उर्वरित रस्ते मोकळे करुन देण्यास स्वत:हून शेतकरी पुढे येणार नसल्यास व अपेक्षित–लोकसहभाग प्रयत्न करुन न मिळाल्यास अतिक्रमित व बंद झालेले रस्ते मोकळे करण्याबाबत उपलब्ध कायदेशीर तरतुदींचा आधार घेऊन रस्ते मोकळे करण्याची पुढील कार्यवाही करण्यात यावी.
- ❖ शेतकऱ्यांकडून मागणी आल्यास व शेतबांधाच्या दोन्ही बाजूंच्या शेतकऱ्यांची संमती असल्यास नवीन शेतरस्ते तयार करण्याची कार्यवाही करणेत यावी.

वरीलप्रमाणे या मोहिमेअंतर्गत अतिक्रमणमुक्त झालेले साधारणत: ६ फूट किंवा त्यापेक्षा जास्त रुंदीचे रस्ते अथवा संमतीने नव्याने तयार केलेले रस्ते महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेअंतर्गत किंवा जिल्हा नियोजन समितीच्या निधीतून किंवा अन्य योजनेअंतर्गत या प्रयोजनार्थ उपलब्ध होऊ शकणा-या निधीतून किंवा विविध कंपन्या / कारखाने / संस्थांच्या Corporate Social Responsibility (CSR) फंडातून विकसित करण्यात यावे.

या सर्व प्रक्रियेसाठी केलेल्या स्वतंत्र App मध्ये अतिक्रमण असतानाची म्हणजेच मोहिमेपूर्वीची रस्त्यांची स्थिती व मोहिमेनंतर अतिक्रमण काढलेनंतर रस्त्यांचे स्वरुप यांची छायाचित्रे काढून साठवून ठेवावीत. जेणेकरुन झालेल्या कामाचे दृश्य परिणाम लक्षात येतील. तसेच भविष्यात अतिक्रमण रोखण्यास मदत होईल. (सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल- प्रपत्र-अ-१७</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

* वरीलप्रमाणे सर्व प्रक्रियेसाठी स्वतंत्र App तयार करण्यात यावे.

### (xviii) <u>अनुसूचित क्षेत्रातील आदिवासी खातेदारांच्या शेतजमिनीची खातेफोड / विभाजन / पोट विभाजन करण्यासंदर्भात मोहीम राबविणे :-</u>

आदिवासी कल्याणार्थ राबविण्यात येणाऱ्या शासनाच्या विविध योजना यशस्वीपणे राबविण्याच्या दृष्टीने सर्व जिल्ह्यातील अनुसूचित क्षेत्रात (Scheduled Area) आदिवासी व्यक्तींनी धारण केलेल्या शेतजमिनीच्या खात्यांची महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ८५ अन्वये खातेफोड करण्याकरीता “विशेष मोहीम” राबविण्यासाठी पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात आले आहेत :-

(I) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ८५ मध्ये कोणत्याही धारण केलेल्या जमिनीमध्ये एकाहून अधिक सहधारक असलेल्या जमिनीतील संबंधित सहधारकांच्या हिश्श्याचे विभाजनाकरीता जिल्हाधिकारी यांच्याकडे अर्ज करण्याची तरतूद आहे. या तरतुदीच्या अनुषंगाने आदिवासी खातेदारांनी धारण केलेल्या शेतजमिनींच्या खात्यांच्या बाबतीत, संबंधित खात्यातील सहधारकांचे खाते विभाजनाबाबत आजमितीस जिल्हाधिकारी अथवा क्षेत्रिय कार्यालयात ***प्रलंबित असलेल्या प्रकरणांचा आढावा*** घेण्यात येवून प्रलंबित

प्रकरणे निकाली काढण्याची मोहीम प्रत्येक जिल्हयात त्वरित आखण्यात यावी व त्याचे संनियंत्रण जिल्हाधिकाऱ्यांच्या स्तरावरुन करण्यात यावे. (याबाबत विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांनी परिपत्रक. क्र.महसूल/२/प्रशासन/कावि/३२३/२०१७ दिनांक १५/०७/२०१७ निर्गमित केले आहे.)

(II) तसेच आदिवासी खातेदारांनी धारण केलेल्या शेतजमिनींच्या खात्यांच्या बाबतीत, संबंधित खात्यातील सहधारकांची आजमितीची स्थिती विचारात घेऊन, त्यांच्या हिश्श्यांच्या विभाजनाकरीता खातेफोड करण्यासाठी आदिवासी बहुल क्षेत्रातील/विशेषत: पेसा क्षेत्रातील गावांमध्ये संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांनी ***"विशेष शिबिरांचे"*** आयोजन करावे. या विशेष शिबिरांच्या आयोजनाबाबत स्थानिक वृत्तपत्रातून व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच शेतजमिनीच्या सर्व संबंधित खातेधारकांना अशा ***"विशेष शिबिरांच्या"*** आयोजनाबाबतची माहिती होण्यासाठी संबंधित गावात दवंडी देखील देण्यात यावी. उक्त नमूद कलम ८५ च्या तरतुदीनुसार शेतजमीन धारकाने धारण केलेल्या जमिनीत एकाहून अधिक सहधारक असतील, अशा खात्यांची खातेफोड करण्यासाठी आवश्यक असलेल्या अर्जाचा नमुना तयार करुन, शिबीर स्थळी तसेच तलाठी कार्यालयात सदर नमुना अर्जाच्या प्रती उपलब्ध राहतील याची दक्षता घेण्यात यावी. सर्व संबंधित आदिवासी खातेदार/सहधारक यांना सदर नमुना अर्जाच्या प्रती वितरीत करण्यात येऊन, सदरहू अर्जातील माहिती भरुन अर्ज पूर्ण करण्यासाठी त्यांना उक्त शिबिरांमध्ये तसेच तलाठयांमार्फत मार्गदर्शन करण्यात यावे. तद्नंतर, संबंधित आदिवासी खातेदांराकडून/सहधारकांकडून अशा अर्जात माहिती नमूद करुन, प्राप्त झालेल्या अर्जावर अधिनियम/नियमांतील तरतुदींनुसार कार्यवाही करुन विहित मुदतीत खातेफोड विषयक फेरफार घेण्यात येऊन, त्यास अंमल देण्यात येईल असे सुनिश्चित करण्यात यावे.

(III) सदर मोहिमेसाठी सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांनी वेळापत्रक निश्चित करुन सदर मोहीम दिनांक ३१ मार्च, २०२१ पर्यंत पूर्ण होईल हे सुनिश्चित करावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१८ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xix) विशेष शिबिरे घेऊन विविध दाखले प्रदान करणे :-**

सर्वसामान्य जनतेस शैक्षणिक व अन्य कामांकरीता विविध स्वरुपाच्या दाखल्यांची आवश्यकता असते. यासंबंधी प्रक्रिया सुकर करण्याच्या दृष्टीने विद्यार्थ्यांना लागणा-या प्रमाणपत्रांकरीता सहामाही/वार्षिक परिक्षेच्या पुर्वी व सुट्टीच्या दिवशी तसेच सर्वसाधारण जनतेस आवश्यक दाखल्यांसाठी जनतेच्या सोयीच्या मध्यवर्ती ठिकाणी विशेष शिबिरे आयोजित करून त्याठिकाणी दाखल्यांकरीता आवश्यक ते अर्ज व कागदपत्रे याबाबत जनतेस माहिती द्यावी व त्याच ठिकाणी अर्ज भरून घेऊन विविध दाखले निर्गमित करण्यात यावेत. यासाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी :-

* तहसिलदारांनी गटशिक्षण अधिका-यांकडून जात प्रवर्ग निहाय इयत्ता ८वी, ९वी, १०वी, ११वी व १२वी च्या विद्यार्थ्यांची पटनिहाय संख्या प्राप्त करुन घ्यावी.

* सर्व प्रथम तालुक्यातील सर्व शाळा व महाविदयालयांची तसेच अन्य "दाखले वाटप शिबिरांची" संख्या निर्धारित करण्यात यावी.
* त्यानंतर तेथे घ्यावयाच्या दाखले वाटप शिबिरांच्या तारखा निश्चित करण्यात याव्यात व त्यास व्यापक प्रमाणात प्रसिध्दी दयावी.
* अशा शिबिरांसाठी निश्चित केलेल्या शाळा किंवा महाविदयालयांच्या मुख्याध्यापक/प्राचार्यांना विविध प्रमाणपत्रांकरिता आवश्यक असलेले अर्जाचे छापील नमुने व आवश्यक असणा-या दस्तऐवजांची यादी पुरविण्यात यावी. वर्गनिहाय प्रकरणे तयार करणे व कागदपत्रांची पुर्तता करणेची जबाबदारी वर्ग शिक्षकांवर राहिल याबाबत त्यांना मुदतीत प्रशिक्षण मिळेल याची व्यवस्था तहसिलदारांनी करावयाची आहे. जेणेकरून शिबिरांच्या दिवशी परिपूर्ण विहित नमुन्यात भरलेले अर्ज विदयार्थ्याकडून प्राप्त करून घेण्यात येतील.
* तत्पूर्वी सदरची मुले ही अज्ञान असलेने शपथपत्रे, स्वयंघोषणापत्र इ. आवश्यक बाबींची पुर्तता करणेसाठी पालक सभांचे आयोजन करण्यात यावे.
* शिबिरांच्या दिवशी आवश्यक असलेला सर्व अधिकारी व कर्मचारी वर्ग शिबिरांस उपस्थित राहील हे सुनिश्चित करण्यात यावे. जेणेकरून विद्यार्थ्यास त्याच दिवशी प्रमाणपत्रे/दाखले पुरविता येतील.
* यासंदर्भात शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण ०२/२०१०/प्र.क्र.-१५/ई-१, दिनांक ३ ऑगस्ट,२०१० मध्ये सविस्तर कार्यपध्दती देण्यात आलेली आहे. त्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

तसेच भटक्या विमुक्त जाती व जमाती व आदिवासी जमातींच्या व्यक्तींना विविध प्रकारचे दाखले प्रदान करण्यासाठी त्यांचे वास्तव्य असलेल्या ठिकाणी तसेच आदिवासी पाडे, तांडे व वस्तीगणिक शिबिरे आयोजित करून दाखले देण्याबाबत विशेष स्वरूपाची मोहीम राबविण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले <u>प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१९</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

### (xx) <u>विस्तारित समाधान योजना राबविणे :-</u>

विस्तारित समाधान योजनेअंतर्गत विविध खात्यांच्या अधिका-यांनी विशिष्ट दिवशी ग्राम/मंडळ स्तरावर एकत्र येऊन जनतेच्या समस्यांचे जागेवरच निराकरण करणे संकल्पित आहे. या विस्तारित समाधान योजनेंतर्गत शासनाच्या विविध विभागांचे अधिकारी व कर्मचारी यांनी ग्राम/मंडळ स्तरावर महिन्यातून एका विशिष्ट पूर्वनियोजित दिवशी एकत्र यावे व जनतेस शासनाच्या विविध योजनांचा लाभ प्रत्यक्ष देण्याची कार्यवाही करावी. त्यासाठी या विस्तारित समाधान योजनेचे अत्यंत सूक्ष्म नियोजन जिल्हाधिकारी यांनी करुन त्यामध्ये सर्व विभागांना योग्य प्रकारे सामावून घ्यावे व त्यास व्यापक पूर्वप्रसिध्दी द्यावी. प्रत्यक्षात कार्यक्रमांचे आयोजन लोकप्रतिनिधी/वरिष्ठ अधिकारी यांच्या उपस्थितीत करण्यात यावे.

वरीलप्रमाणे समाधान योजनेअतंर्गत काही कार्यक्रम विशेषत्वाने महिला खातेदारांसाठी गाव पातळीवर घेऊन त्यांच्या अडीअडचणी सोडवणे व त्यांचे सक्षमीकरण करण्यासाठी विशेष मेळावे आयोजित करण्यात यावेत. या विशेष मेळाव्यांतर्गत महिला खातेदारांना शासनाच्या विविध विभागांमार्फत शेतक-यांसाठी, विशेषत्वाने महिलांसाठी राबविल्या जाणा-या योजनांची माहिती देणे,

तसेच महिला खातेदारांच्या महसूल विभागाविषयी निगडित असणा-या अडीअडचणी समजून घेऊन त्यांचे त्याच ठिकाणी निराकरण करणे याकडे प्राधान्याने लक्ष देण्यात यावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र अ-२० मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xxi) भारतीय सैन्यदलात, किंवा सशस्त्र दलामध्ये कार्यरत असणाऱ्या जवानास अथवा अधिकाऱ्यास कोणत्याही युद्धात किंवा युद्धजन्य परिस्थितीत किंवा कोणत्याही लष्करी कारवाईत वीरमरण आल्यास जमीन प्रदान करणे:-**

महसूल व वन विभाग यांनी दि. ३/४/२०१८ रोजी शासन अधिसूचनेअन्वये महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) (सुधारणा) नियम,२०१८ प्रसिद्ध केले आहे. या अधिसूचनेमध्ये नियम “११अ” नव्याने खालीप्रमाणे समाविष्ट करण्यात आला आहे.

" नियम ११अ - पुर्ववर्ती नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, परंतु नियम १२ मधील तरतुदीस अधीन राहून, भारतीय सैन्यदलात, किंवा सशस्त्र दलामध्ये कार्यरत असणाऱ्या आणि या राज्यातील अधिवासी असणाऱ्या जवानास अथवा अधिकाऱ्यास कोणत्याही युद्धात किंवा युद्धजन्य परिस्थितीत किंवा कोणत्याही लष्करी कारवाईत वीरमरण आल्यास, अशा जवानाच्या अथवा अधिकाऱ्याच्या विधवा पत्नीस किंवा त्यांच्या कायदेशीर वारसास निर्बाधरित्या वाटपासाठी उपलब्ध असलेली नेमून देण्यायोग्य जमीन, कृषी प्रयोजनासाठी, भोगाधिकार मुल्यरहित, विना लिलाव प्रदान करण्यास जिल्हाधिकारी सक्षम राहतील. अशा सैन्यदलातील, किंवा सशस्त्र दलातील जवान अथवा अधिकाऱ्याच्या विधवा पत्नीस किंवा त्यांच्या कायदेशीर वारसांस याप्रमाणे जमीन प्रदान करताना उत्पन्नाची मर्यादा आवश्यक राहणार नाही."

जवान अथवा अधिकाऱ्यांना वीरमरण आल्यास अशा जवान अथवा अधिकाऱ्यांच्या विधवा पत्नीस किंवा कायदेशीर वारसास जमीन प्रदान करणेबाबतच्या सर्व जिल्ह्यांमधील मागण्या प्रलंबित आहेत या मागण्यांवर अंतिम निर्णय घेणेस जिल्हाधिकारी सक्षम आहेत याबाबत जिल्हाधिकारी कार्यालयातील प्रकरणांचा आढावा घेणे आवश्यक आहे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२१ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xxii) शेतकरी आत्महत्याग्रस्त कुटुंबांची (वारसांची) नावे अधिकार अभिलेखात घेणे तसेच शेतकरी आत्महत्याग्रस्त कुटुंबियांना शासनाच्या विविध योजनांचा लाभ देण्याकरिता महसूल मंडळ स्तरावर विशेष शिबिर आयोजित करणे:-**

शेतकरी आत्महत्याग्रस्त कुटुंबियांची यादी तहसिल स्तरात्रर निश्चित करुन शेतकरी आत्महत्याग्रस्त कुटुंबातील सदस्यांना / वारसांना विविध शासकीय योजनांचा लाभ - देण्याकरिता महाराजस्व अभियातंर्गत विशेष मोहीम राबविण्यात यावी. या विशेष मोहिमेअंतर्गत शेतकरी आत्महत्याग्रस्त कुटुंबातील सदस्यांना / वारसांना खालीलप्रमाणे शासकीय योजनांचा लाभ देण्यात यावा.

अ) वारसांच्या नोंदी अद्ययावत करणे.

ब) रेशन कार्डाच्या नोंदी अद्ययावत करणे.

क) घरकुल योजनेचा लाभ मंजूर करणे.

ड) सामाजिक अर्थ सहाय्य योजनेचा लाभ मंजूर करणे.

ई) कृषि / पशुसंवर्धन / सहकार इत्यादी विविध विभागांच्या विविध योजनांमध्ये असे कुटुंबिय पात्र असल्यास त्या त्या विभागांच्या योजनांचा लाभ प्राधान्याने देण्यात यावा.

**शहीद जवान, आत्महत्याग्रस्त शेतकरी व समर्पण केलेले नक्षलग्रस्त यांच्या कुटुंबांची/ वारसांची नावे अधिकार अभिलेखात घेणे, तसेच त्यांना शासनाच्या विविध योजनांचा लाभ देणेकामी त्यांचेकडून तात्काळ अर्ज भरुन घेणे या दोन्ही बाबी फेरफार अदालतीत प्राधान्याने करण्यात याव्यात.**
(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२२ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xxiii) गौण खनिज अवैध उत्खनन व वाहतूक संबंधाने ड्रोन कॅमेरा, सी.सी.टिव्हीचा वापर करणे, तसेच गौण खनिज वाहतुकीशी संबंधित सर्व वाहनांवर जीपीएस प्रणालीचा वापर अनिवार्य करणे :-**

ड्रोन कॅमेरे आणि सी.सी.टीव्हीचा वापर गौण खनिज अवैध उत्खनन आणि वाहतुकीला आळा घालणेसाठी करणेत यावा. तसेच गौण खनिज वाहतुकीसाठी GPS Tracking System चा वापर करणेत यावा. खाण क्षेत्रामध्ये GPS आणि Drone तंत्रज्ञानाच्या विस्तृत वापर करुन खालील नमूद कार्यवाही करणेत यावी.

१) भाडेपट्ट्यांची सीमा पडताळणी आणि खाण पट्ट्यांचे भू-संदर्भ निश्चित करणेत यावेत.
२) खाणीच्या कामकाजाचे विश्लेषण करण्यासाठी वापरल्या जाणा-या नमुन्यामधील फरकाचा अभ्यास करण्यासाठी नियमित अंतराने हवाई सर्वेक्षण करणेत यावे.
३) बेकायदा खाणकाम/ वाहतुकीचे कामे होत आहेत का हे पाहण्यासाठी रात्रीच्या वेळी देखील Drone तैनात करावेत.
४) लक्ष्यित ट्रॅकिंग (Target Tracking) सुविधा बेकायदा ट्रकच्या हालचालींसाठी वापरणेत यावी. स्थायी खाणपट्टेधारकांसाठी जीपीएस ट्रॅकिंग सिस्टम लागू करावी. तसेच किरकोळ खनिज वाहून नेण्याची परवानगी असलेल्या प्रत्येक वाहनांची नोंदणी यंत्रणेमध्ये करणेत यावी.
५) जीपीएस ट्रॅकिंग सिस्टममध्ये जीपीएस डिव्हाइस वापरुन वाहनांच्या हालचालींचा मागोवा घेण्यासाठी असलेल्या वाहन ट्रॅकिंग सिस्टम मोड्यूलचा वापर करावा.
६) भु-कुंपण सुविधा वैध किंवा अवैध वाहनांच्या हालचाली कमी करण्यास सक्षम असेल. वाहनांची बेकायदा हालचाल ओळखण्यासाठी सतर्क संदेश दिले जातील या सुव्यवस्थेचा वापर करावा.
७) सी.सी.टीव्ही कॅमेरे इंटरनेट कनेक्टिव्हिटी प्रदान करणा-या मुख्य एंट्री पॉइंटमध्ये वेगवेगळया ठिकाणी स्थापित करुन वाहनांच्या बेकायदेशीर वाहतुकीचा मागोवा संबंधित कार्यालयांमधील अधिकाऱ्यांकडून घेणेत यावा.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२३ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xxiv) मयत इनामदारांच्या विरासत कारवाईची प्रकरणे तात्काळ निकाली काढणे तसेच ज्या प्रकरणात विरासत मंजूर नाही अशी जमीन शासनाच्या ताब्यात घेऊन लिलाव करणे:-**

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२४ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xxv) <u>निस्तार पत्रक व वाजिब -उल - अर्ज च्या नोंदी अद्ययावत करणे :-</u>

महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ मध्ये कलम १६१ ते १६६ अंतर्गत निस्तार पत्रक व वाजिब-उल-अर्ज च्या नोंदी घेण्याची तरतूद आहे. परंतु ब-याच कालावधीपासून या नोंदी अद्ययावत करण्यात आले नसल्याची बाब निर्दशनास आली आहे. त्यामुळे सदर बाबींचा समावेश महाराजस्व अभियानात करुन मोहीम स्वरुपात निस्तार पत्रक व वाजिब-उल-अर्ज च्या नोंदी अद्ययावत करण्यात याव्यात.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेल्या <u>प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२५</u> मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xxvi) <u>लोकसेवा हक्क अधिनियम-२०१५ची प्रभावी अंमलबजावणी करणे:-</u>

१. आपले सेवा केंद्रांवर सर्व विभागांच्या सर्व सेवा उपलब्ध करून देण्यात याव्यात.
२. Online प्रकरणे निकाली काढल्यानंतर संगणकीय प्रणालीमध्ये "निकाली" निघाले असे दाखविणे आवश्यक आहे. प्रत्यक्षात अपील निकाली काढल्यानंतर संगणकीय प्रणालीमध्ये Disposed दाखविले जात नसल्यामुळे संगणकीय प्रणालीमध्ये प्रकरणे प्रलंबित दिसतात. याबाबत संबंधितांकडे पाठपुरावा करून सुधारणा करण्यात याव्यात.
३. Desk-१ व Desk-२ वर वेगवेगळे कर्मचारी कागदपत्रांची तपासणी करतात. मधल्या कुठल्याही एका Desk ने प्रकरणास विलंब लावल्यास अंतिम स्वाक्षरी करिता विलंब होतो आणि त्यामुळे काही प्रकरणात विहित कालावधीत प्रमाणपत्र देणे शक्य होत नाही यातील एक Desk कमी केल्यास विलंब कमी होईल अशी सुधारणा प्रस्तावित करून अधिक जलद पद्धतीने प्रकरणे निकाली काढण्याबाबत पाठपुरावा करण्यात यावा.
४. Maha Online Portal वरील काही तांत्रिक कारणामुळे प्रमाणपत्र मंजूर करण्यास विलंब होतो व त्यामुळे प्रमाणपत्र देण्यास विलंब होतो याबाबत संबंधितांकडे पाठपुरावा करून सुधारणा करण्यात याव्यात.
५. प्रत्येक जिल्ह्यामध्ये प्रतिज्ञापत्र साक्षांकित करण्यासाठी मोठया प्रमाणात अर्ज प्राप्त होतात. एकंदरीत पाहता अर्जांची संख्या फार मोठया प्रमाणात आहे आणि सेवा देण्याकरीताचा विहित कालावधी फक्त एक दिवसाचा आहे. एवढया कमी कालावधीमध्ये एवढया मोठया प्रमाणावरील अर्जाचा निपटारा करणे शक्य होत नाही. तसेच प्रतिज्ञापत्र वितरीत करण्याचा कालावधी एक दिवसाचा आहे. प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर एकाच दिवसामध्ये दाखल केल्यानंतर प्रिंट काढून कार्यकारी दंडाधिकारी यांचेकडे येते व एक दिवस विलंब झाला तरी Not on time delivery मध्ये गणले जातात. त्यामुळे सदर सेवेचा कालावधी हा कमीतकमी तीन दिवसांचा करण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात यावा.
६. महा ऑनलाईन द्वारे प्राप्त होणारे अर्ज हे ज्यावेळी त्रुटी मध्ये काढले जातात त्यावेळी ते पुन्हा सेतु केंद्रात नागरीकासाठी त्रुटी पुर्ण करण्याकरीता उपलब्ध झालेले असतात. अशा वेळी त्रुटी पुर्ण करुन आलेला अर्ज महाऑनलाईन प्रणालीवर अर्जदाराने सर्वात प्रथम केलेल्या तारखेपासून प्रलंबित अर्ज म्हणून दिसतो. त्रुटी पुर्तता केल्यानंतर अर्जदार जेव्हा अर्ज ऑनलाईन प्रक्रियेद्वारे पुन्हा सादर करतो तेव्हा त्रुटी पुर्तता केल्याचा दिनांक हाच त्या अर्जाचा नवीन दिनांक मानण्यात यायला हवा. मात्र असे होत नाही. त्यामुळेच विविध कालावधीत

दिल्या जाणाऱ्या सेवा या कालावधीनंतर दिल्या गेल्या असे गणले जाते. यामध्ये सुधारणा करणेबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात यावा.

७. सेवा हमी कायद्याअंतर्गत विभागीय डॅशबोर्ड लॉगीन (Log in) देण्यात यावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल- प्रपत्र अ-२६ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(ब) प्रशासकीय घटक :-**

महाराजस्व अभियानांतर्गत खालील प्रशासकीय घटक, जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य), पुणे व त्यांची अधिनस्त कार्यालये तसेच विभागीय आयुक्त कार्यालयापासून ते तहसिल कार्यालयापर्यंत सर्व क्षेत्रिय महसूली कार्यालयांमध्ये प्रभावीपणे राबविण्यात यावेत:-

**(i) सर्व संवर्गांची ज्येष्ठतासूची अद्ययावत करणे. :-**

गट-अ ते गट-ड संवर्गातील क्षेत्रिय स्तरावर कर्मचा-यांची अद्ययावत ज्येष्ठतासूची तयार करुन ती मार्च २०२१ अखेर पर्यंत अंतिमत: प्रसिध्द करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(ii) विविध संवर्गासाठी बिंदूनामावली अद्ययावत करून प्रमाणित करणे व Online Roster भरणे.**

गट-अ ते गट-ड संवर्गातील कर्मचा-यांची बिंदूनामावली अद्ययावत करुन ती प्रमाणित करुन घेण्यात यावी तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या सूचनेनुसार सदर माहिती Online Roster प्रणाली मध्ये भरण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-२ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(iii) अधिकारी /कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल अद्ययावत ठेवणे. :-**

दरवर्षी कार्यरत अधिकारी / कर्मचाऱ्यांचे वार्षिक मूल्यमापन करण्यासाठी संबंधित कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहिले जातात. संबंधित कर्मचाऱ्यांची पदोन्नती, परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, वयाच्या ५०/५५ वर्षी पुनर्विलोकन करणे इ. साठी सदर गोपनीय अहवाल विचारात घेतले जातात. त्याकरीता संबंधित कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल सामान्य प्रशासन विभागाने विहित केलेल्या कार्यपध्दती व वेळापत्रकानुसार विहित वेळेत त्यांचे वरिष्ठांकडून प्रतिवेदित व पुनर्विलोकित केले जातील व त्यानुसार ते संबंधित कर्मचाऱ्यास उपलब्ध करुन दिले जातील याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-३ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(iv) गट-क च्या कर्मचाऱ्यांसाठी विभागीय परीक्षा आयोजित करणे. :-**

पदोन्नतीसाठी व सेवेत स्थायीकरण प्राप्त करण्यासाठी कर्मचाऱ्यांनी त्या त्या संवर्गासाठी विहित केलेल्या विभागीय परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. त्याकरीता सर्व संबंधित अधिकारी /

कर्मचाऱ्यांना विभागीय परीक्षा देता यावी यासाठी विहित कालावधीत विभागीय परीक्षांचे आयोजन करणे व त्याचे निकाल विहित मुदतीत जाहीर करणेबाबत कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-४ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(v) **पदोन्नती प्रस्ताव तयार करणे. :-**

गट-अ ते गट-ड संवर्गातील कर्मचा-यांची सेवा ज्येष्ठतासूची तसेच प्रमाणित बिंदू नामावली विचारात घेऊन पदोन्नतीबाबतचे प्रस्ताव सत्वर तयार करुन संबंधित सक्षम प्राधिका-याकडे सादर करण्यात यावेत.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-५ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(vi) **अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी सेवांतर्गत प्रशिक्षण आयोजित करणे. :-**

सामान्य प्रशासन विभागाने शासकीय कर्मचाऱ्यांसाठी घेतलेल्या सेवांतर्गत प्रशिक्षणाबाबत घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार महसूल सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांना आपली कर्तव्ये व जबाबदाऱ्या सक्षमपणे पार पाडता याव्यात तसेच त्याचा प्रशासनात प्रभावीपणे उपयोग व्हावा आणि त्यानुषंगाने जनतेस अचूक व जलदगतीने सेवा उपलब्ध व्हाव्यात यासाठी संबंधित अधिकारी / कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत प्रशिक्षण देणे आवश्यक आहे. तेव्हा विभागामार्फत तसेच अन्य प्रशिक्षण संस्थांमार्फत नियमितपणे अधिकारी / कर्मचाऱ्यांना सेवांतर्गत प्रशिक्षण देण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-६ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(vii) **प्रलंबित विभागीय चौकशी पूर्ण करणे :-**

(१) गट-अ ते गट-ड संवर्गातील कर्मचा-यांची विभागीय चौकशीबाबतची प्रलंबित प्रकरणे विहित मुदतीत निकाली काढणे आवश्यक आहे. प्रकरणाचे गांभीर्य विचारात घेऊन महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार चौकशी सुरु करणे, चौकशी सुरु केलेल्या प्रकरणी चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी अविलंब नेमणे आणि चौकशी अहवाल विहित मुदतीत प्राप्त करुन घेऊन शिक्षा अंतिम करण्याबाबत तातडीने कार्यवाही करणे आवश्यक आहे. दिनांक १ एप्रिल, २०२० रोजी दोन वर्षे व त्याहून अधिक काळ प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांवर ३१ मार्च, २०२१ पूर्वी अंतिम कार्यवाही होईल, हे सुनिश्चित करण्यात यावे.

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : निप्रआ-१११२/प्र.क्र.८२/११-अ, दिनांक २३/०४/२०१३ अन्वये नव्याने सुरु होणा-या विभागीय चौकशी प्रकरणांच्या बाबतीत विहित कालमर्यादेचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

(३) विभागीय चौकशी सुरु होणा-या सर्व प्रकरणांमध्ये वेळेवर विभागीय चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांची नियुक्ती करण्यात यावी आणि चौकशी अहवाल विहित कालमर्यादेत प्राप्त होईल यासाठी आवश्यक पाठपुरावा करण्यात यावा.

(४) ज्या प्रकरणी विभागीय चौकशी अहवाल प्राप्त झाले आहेत अशी प्रकरणे अविलंब अंतिम निर्णयाप्रत येतील असे सुनिश्चित करण्यात यावे.

वरीलप्रमाणे कार्यवाही होण्याच्या दृष्टीने प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांचा नियमित स्वरुपात आढावा घेण्यात यावा.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-७(१) व ब-७(२) मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(viii) सेवापुस्तके अद्ययावत करणे. :-**

गट-अ ते गट-ड संवर्गातील कर्मचा-यांच्या सेवापुस्तकांमध्ये आवश्यक त्या नोंदी सत्वर घेऊन सेवापुस्तके अद्ययावत करण्यात यावीत.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-८ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(ix) महालेखापाल कार्यालयाने लेखा परीक्षणात आक्षेपित केलेले जमा व खर्चाचे परिच्छेद मोहीम घेऊन निकाली काढणे. :-**

(अ) महालेखापाल कार्यालयाकडून दरवर्षी महसूल विभागांतर्गत क्षेत्रिय कार्यालयांचे लेखापरीक्षण केले जाते. सदर लेखापरीक्षणात आक्षेपित केलेले जमा व खर्चाचे परिच्छेद मोठया प्रमाणात प्रलंबित आहेत. जमा लेखा परिच्छेदांमध्ये अंतर्भूत असलेली जमा रक्कम वसूल करुन दिनांक ३१.०३.२०२० पर्यंत संबंधित लेखापरिच्छेद निकाली काढणेबाबत नियोजनबध्द कार्यवाही करण्यात यावी.

(ब) महालेखापाल कार्यालयाकडून लेखा परीक्षणाद्वारे प्राप्त झालेले विविध स्वरुपाचे प्रलंबित परिच्छेद, शिफारशी व विनियोजन लेख्यांवरील प्रलंबित स्पष्टीकरणात्मक ज्ञापने या अन्वये निदर्शनास आलेल्या त्रुटी / अनियमिततांबाबत स्पष्टीकरण देऊन नियोजनबध्द पध्दतीने विहित कालावधीत निकाली काढण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-९(१) व ब-९(२) मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(x) लोकलेखा समितीचे अहवाल, नागरी अहवाल व महसूली जमा अहवालावरील प्रलंबित परिच्छेद व शिफारशी या विषयी क्षेत्रिय स्तरावरील कार्यवाही अविलंब पूर्ण करणे. :-**

महालेखापाल कार्यालयाकडून लेखापरीक्षणात आढळून आलेल्या अनियमिततेच्या अनुषंगाने विविध अहवाल विधानमंडळाला सादर केले जातात. त्यावर लोकलेखा समितीकडून वेळोवेळी संबंधित अहवालाच्या अनुषंगाने विभाग प्रमुखांची साक्ष घेण्यात येते. अशा साक्षीच्या वेळी प्रलंबित परिच्छेद व शिफारशींबाबत करण्यात आलेल्या कार्यवाही विषयी विचारणा केली जाते. तेव्हा प्रलंबित

असलेल्या उक्त परिच्छेदांवर व शिफारशींवर क्षेत्रिय स्तरावर अपेक्षित कार्यवाही विहित मुदतीत पूर्ण करुन शासनास अहवाल सादर करण्याची दक्षता घ्यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१०(१), ब-१०(२) व ब-१०(३) मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xi) **प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापाल कार्यालयास सादर करणे. :-**

प्रलंबित “उपयोगिता प्रमाणपत्रे” महालेखापाल कार्यालयास विहित मुदतीत सादर करुन प्रलंबित प्रकरणे निकाली काढण्याच्या दृष्टीने सत्वर कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-११ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xii) **प्रलंबित संक्षिप्त देयकांची तपशिलवार देयके महालेखापाल कार्यालयास सादर करणे. :-**

प्रलंबित संक्षिप्त देयकांची तपशिलवार देयके महालेखापाल कार्यालयास विहित मुदतीत सादर करुन याबाबतची प्रलंबितता अभियान कालावधीत निकाली काढण्याच्या दृष्टीने कार्यवाही करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१२(१) व ब-१२(२) मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xiii) **सहा गठ्ठा (बंडल) पध्दतीने अभिलेख ठेवणे व झिरो पेन्डन्सी ॲन्ड डेली डिस्पोजल कार्यपध्दती राबविणे. :-**

सर्व कार्यालयांमध्ये सहा स्तरीय अभिलेख ठेवण्यासंबंधी पध्दतीचा अवलंब करण्यात यावा व त्यानुसार प्रत्येक कार्यासनातील अभिलेख, चालू असलेल्या संदर्भांची कागदपत्रे, प्रतिक्षाधीन कागदपत्रे, नियतकालिके, स्थायी आदेश फाईल, अभिलेखपात्र कागदपत्रे, ड-वर्ग कागदपत्रे अशी वर्गवारी करुन सहा गठ्ठयात ठेवण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.९/१८(र.व.का.) दि.१५.०२.२०१८ अन्वये विहित केलेली झिरो पेन्डेन्सी ॲन्ड डेली डिस्पोजल कार्यपध्दती कार्यालयीन कामकाजासाठी राबविण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१३ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xiv) **अभिलेख कक्ष अद्ययावत करणे. :-**

शासकीय कामकाजासाठी अत्यावश्यक असलेले लेखे अभिलेख कक्षांमध्ये जतन केले जातात. अशा अभिलेख्यांचे अ,ब,क,ड वर्गवारीनुसार वर्गीकरण करण्यात यावे. तहसिल कार्यालय ते विभागीय आयुक्त कार्यालयापर्यंतचे सर्व अभिलेख कक्ष ३१ मार्च, २०२१ पूर्वी अभिलेखांचे वर्गीकरण करुन अद्ययावत केले जातील व त्यातील नाश करण्यास पात्र कागदपत्रांवर विहित मुदतीत नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल असे सुनिश्चित करण्यात यावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१४ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xv) जडवस्तू संग्रह नोंदवहीचे अद्ययावतीकरण करणे. :-**

जडवस्तू संग्रह नोंदवहीचे अद्ययावतीकरण करण्यात यावे. संग्रह पडताळणीचे दाखले दर सहा महिन्यांनी वरिष्ठ कार्यालयास पाठविण्यात यावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१५ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xvi) नाविन्यपूर्ण योजना उपविभाग / तहसिल कार्यालय येथे राबविणे :-**

महाराजस्व अभियानामध्ये कार्यवाही करावयाच्या वरील मुद्यांव्यतिरिक्त संबंधित विभागीय आयुक्त, संबंधित जिल्हाधिकारी, संबंधित उपविभागीय अधिकारी किंवा संबंधित तहसिलदार यांना त्यांचे कार्यक्षेत्रामध्ये लोकाभिमुख व लोकोपयोगी इतर कोणताही नाविन्यपूर्ण उपक्रम राबवायचा असल्यास ते या वर्षाच्या राजस्व अभियानामध्ये हाती घेऊ शकतात. त्या-त्या भागातील गरज, भौगोलिक परिस्थिती, त्या भागानुसार वेगळे महसूली विषय इत्यादी याअंतर्गत राबविले जाऊ शकतात. यासंदर्भात संबंधित जिल्हाधिकारी यांच्या मार्गदर्शनाखाली राबविलेल्या संबंधित नाविन्यपूर्ण उपक्रमांच्या अहवालाची शासनास माहिती सादर करण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१६ मध्ये संकलित करण्यात यावी.)

**(xvii) महसूल कार्यालय सामान्य जनतेच्या सोयीसाठी चांगले करणे, अद्ययावत करणे, वृक्षारोपण करणे, बसण्याची, पिण्याच्या पाण्याची सोय करणे, कर्मचाऱ्यांना ओपन जिम, अद्ययावत सुविधा निर्माण करणे:-**

सामान्य नागरिक त्यांची कामे/समस्या घेऊन महसूल कार्यालयात येतात. त्यांना त्यांचे काम होणेबाबत विश्वासार्हता व सकारात्मकता वाटणे आवश्यक आहे. या दृष्टीकोनातून शासकीय कार्यालयात सामान्य नागरिकांचे सोयीसाठी स्वागतकक्ष निर्माण करणे, उत्तम बैठक व्यवस्था, पिण्यासाठी पाणी व स्वच्छतागृहे, विविध शासन योजनांची माहिती असणारी पुस्तिका, KIOSK इ.सोयी निर्माण करण्यात याव्यात.

त्याचबरोबर कार्यालयाच्या आवारात मोठया प्रमाणावर वृक्षारोपण करणे, कर्मचाऱ्यांसाठी ओपन जिमची सुविधा निर्माण करुन देणे तसेच जागा उपलब्धता विचारात घेऊन मियावाकी वृक्षारोपण करणेत यावे.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१७ मध्ये संकलित करण्यात यावी.)

(xviii) **अखिल भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकारी यांच्या धर्तीवर महाराजस्व अभियान वर्षातून किमान एकदा शासनामार्फत सर्व महसूल अधिकारी यांची संपूर्ण वैद्यकीय तपासणी करणेकरीता विशेष मोहीम राबविणे:-**

महसूल विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची कार्यक्षमता वाढावी या दृष्टीने महाराजस्व अभियानांतर्गत वर्षातून किमान एकदा शासनामार्फत सर्व महसूल अधिकारी यांची अखिल भारतीय प्रशासकीय अधिकारी यांचे धर्तीवर संपूर्ण वैद्यकीय तपासणी करणेकरीता विशेष मोहीम राबविण्यात यावी.

(सदर माहिती प्रस्तुत शासन निर्णयासोबत जोडलेले प्रगती अहवाल-प्रपत्र ब-१८ मध्ये संकलित करण्यात यावी.)

३. राज्यातील सर्व जिल्हाधिकारी यांनी वरील दिशानिर्देशांप्रमाणे **"महाराजस्व अभियान"** आपआपल्या जिल्हयांमध्ये प्रभावीपणे राबविण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करावेत आणि या अभियानाच्या अंमलबजावणीचा आढावा घेऊन त्याबाबतचा **मासिक** प्रगती अहवाल विभागीय आयुक्त यांना सादर करावा. विभागीय आयुक्त यांनी या अभियानाचा नियमितपणे आढावा घेऊन **तिमाही** प्रगती अहवाल शासनास सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" व प्रपत्र "ब" मध्ये सादर करावा. त्याचप्रमाणे जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख, (महाराष्ट्र राज्य), पुणे यांनी स्वतंत्रपणे या अभियानांतर्गत त्यांच्या अधिनस्त कार्यालयात होणा-या कार्यवाहीचा आढावा घेऊन **तिमाही** प्रगती अहवाल शासनास सोबत जोडलेल्या प्रपत्र "अ" व प्रपत्र "ब" मध्ये सादर करावा.

४. प्रस्तुत महाराजस्व अभियानाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी अभियानात अंतर्भूत विविध लोकाभिमुख व प्रशासकीय घटकांच्या निपटाऱ्यासाठी कालबद्ध मोहीम आखून प्रलंबित कामांचा निपटारा करणे आवश्यक आहे. अशा घटकांसाठी सर्व विभागीय आयुक्तांनी घटकनिहाय कालबद्ध कार्यक्रम निश्चित करुन सर्व जिल्हाधिकाऱ्यांना अनुपालनाचे निर्देश द्यावेत व याबाबतचे अंमलबजावणीचे संनियत्रण त्यांचे स्तरावर करुन या कार्यक्रमाचा वेळोवेळी आढावा घ्यावा व त्याबाबतचा **त्रैमासिक** अहवाल वर नमूद केल्याप्रमाणे विहित केलेल्या सोबतच्या विवरणपत्रात शासनास नियमितपणे सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ.नितिन करीर)
**अपर मुख्य सचिव (महसूल)**

प्रत :

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई : ३२.
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई : ३२.
३. सर्व जिल्हयांचे मा.पालकमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई : ३२.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई : ३२.
६. प्रधान सचिव (वने), मंत्रालय, मुंबई : ३२.
७. सचिव (मदत व पुनर्वसन), मंत्रालय, मुंबई : ३२.
८. सर्व जिल्हयांचे पालक सचिव.
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. जमाबंदी आयुक्त तथा संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे: ०१.
११. नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे :०१.
१२. सर्व जिल्हाधिकारी.
१३. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी तथा त्यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई : ३२.
१४. सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई : ३२.
१५. निवड नस्ती, कार्यासन म-५, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई : ३२.

******

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-१

**विषय : प्रत्येक गावात शिवारफेरी कार्यक्रम आयोजित करणे.**

अहवालाचा महिना : अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | गावांची एकूण संख्या | शिवारफेरी कार्यक्रम आयोजित केलेल्या गावांची संख्या | शिल्लक गावांची संख्या |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |
| ६ | | | | |
| एकूण | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-२

## विषय:- अनधिकृत अकृषिक वापराच्या नोंदी घेवून कारवाई करणे.

अहवालाचा महिना: अखेर

विभाग :-

| अ.क्र. | जिल्हा | दिनांक ३१.०७.२०२० अखेर अनधिकृत अकृषिक प्रकरणे | | दिनांक ०१.०८.२०२० पासून अहवाल महिनाअखेर शोध घेतलेली प्रकरणे | | एकुण शोध घेतलेली अनधिकृत अकृषिक प्रकरणे | | अहवाल महिना अखेर कार्यवाही केलेल्या अनधिकृत अकृषिक प्रकरणांची संख्या | | | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | संख्या | | संख्या | | संख्या | | प्रकरणे | | वसूल दंडाची रक्कम (रु. लाखात) | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) | (१२) |
| १ | | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-३

## विषय : शासकीय पड/ गायरान व सार्वजनिक जमिनीवरील अतिक्रमणे निष्कासित करणेबाबत मोहीम

अहवालाचा महिना: अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | दिनांक ३१.०७.२०२० अखेर एकूण अतिक्रमणे | | दिनांक - ३१.०७.२०२० अखेरच्या अतिक्रमणांपैकी | | | | | | | | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | मागील महिना अखेर निष्कासित केलेली अतिक्रमणे | | अहवाल महिन्यात निष्कासित केलेली अतिक्रमणे | | एकूण निष्कासित केलेल्या अतिक्रमणे | | अहवाल महिना अखेर शिल्लक अतिक्रमणे | | |
| | | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) | (१२) | (१३) |
| १ | | | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-४

## विषय : इनाम व वतन जमीन शर्तभंग तपासणी व कार्यवाही करणे.

अहवालाचा महिना: अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | दिनांक ३१.०७.२०२० अखेर प्रलंबित शर्तभंग प्रकरणे | | दिनांक ०१.०८.२०२० पासून अहवाल महिना अखेर शोधलेली शर्तभंग प्रकरणे | | कार्यवाहीस पात्र एकूण शर्तभंगाची प्रकरणे | | शर्तभंग प्रकरणात अहवाल महिना अखेर केलेली कार्यवाही | | अहवाल महिना अखेर कार्यवाही प्रलंबित असलेली प्रकरणे | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | संख्या | क्षेत्र | नियमानुकूल केलेली प्रकरणे | वसूल केलेली रक्कम (लाखात) | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) | (१२) |
| १ | | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | | | | |
| | एकूण | | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल प्रपत्र - अ - ५ (१)

**विषय:- विविध प्रयोजनासाठी शासकीय जमीन कब्जेहक्काने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या प्रकरणी कार्यवाही करणे.**

(संदर्भ :- शासन परिपत्रक क्र. लेखाप-१०/२०११/प्र.क्र.१५९/ज-१, दिनांक -०३.०३.२०१२)

अहवालाचा महिना: अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | कब्जेहक्काने / भाडेपट्ट्याने शासकीय जमीन प्रदान केलेल्या प्रकरणांची संख्या व जमिनींचे क्षेत्र | | अहवाल महिना अखेर शर्तभंग आढळून आलेल्या प्रकरणांची संख्या | अहवाल महिना अखेर शर्तभंग प्रकरणी कार्यवाही केलेल्या प्रकरणांची संख्या | शर्तभंग प्रकरणी शासन जमा केलेली एकूण जमीन (हे.आर.) | अहवाल महिना अखेर शर्तभंग आढळून आलेल्या कार्यवाहीसाठी प्रलंबित प्रकरणांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रकरणे | क्षेत्र (हे.आर) | | | | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल प्रपत्र - अ - ५ (२)

**विषय :- विविध प्रयोजनांसाठी शासकीय जमीन कब्जेहक्कांने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या प्रकरणी कार्यवाही करणे.**

(संदर्भ :- शासन परिपत्रक क्र. जमीन - ०८/२०१२/प्र.क्र.५१/ज-१, दिनांक -२३.१०.२०१२)

अहवालाचा महिना: अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | कब्जेहक्काने / भाडेपट्टयाने शासकीय जमीन प्रदान केलेल्या प्रकरणांची संख्या व जमिनीचे क्षेत्र | | शासकीय जमिनींच्या जागेतील इमारत / सिमाभिंत येथील दर्शनी भागावर विहित प्रमाणपत्र लावण्यात आलेल्या प्रकरणांची संख्या. | शासकीय जमिनींच्या जागेतील इमारत / सिमाभिंत येथील दर्शनी भागावर विहित प्रमाणपत्र न लावण्यात आलेल्या प्रकरणांची संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रकरणे | क्षेत्र (हे. आर) | | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल प्रपत्र -अ- ५(३)

**विषय :- विविध प्रयोजनासाठी शासकीय जमीन कब्जेहक्कांने अथवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या प्रकरणी कार्यवाही करणे.**

(संदर्भ :- शासन परिपत्रक क्र. जमीन - ०८/२०१२/प्र.क्र.४९/ज-१, दिनांक -२६.११.२०१२)

अहवालाचा महिना : अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | वित्तीय मर्यादेनुसार जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त / शासन मान्यतेने जमीन मंजूरीचे निर्गमित केलेले आदेश / | | जिल्हयाचे संकेतस्थळावर प्रसिध्द केलेल्या आदेश / सनद / कराराच्या प्रतींची संख्या | जिल्हाधिकारी कार्यालयाचे संकेतस्थळ | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-६(१)

विषय : भाडेपट्टयाने अथवा कब्जेहक्काने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींपैकी कृषिक / निवासी / वाणिज्यिक / औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या जमिनींचा धारणाधिकार भोगवटादार वर्ग-१ मध्ये रूपांतरित करण्याकरिता शासन राजपत्रात अंतिमत: प्रसिद्ध केलेले "महाराष्ट्र जमीन महसूल (भोगवटादार वर्ग-२ आणि भाडेपट्टयाने प्रदान केलेल्या जमिनी भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित करणे) नियम,२०१९ (अधिसूचना क्र. जमीन-२०१८/प्र.क्र.९०/ज-१, दि.८.३.२०१९)" अन्वये कार्यवाही.

अहवालाचा महिना : अखेर

विभाग :-

| अ.क्र. | जिल्हा | कृषिक प्रयोजनासाठी भोगवटादार वर्ग-२ धारणाधिकारावर किंवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या जमिनीचे भोगवटादार वर्ग-२ मध्ये रुपांतरण करण्यासंबंधी प्रकरणांची संख्या (दि.०३.०३.२०२० अखेर) | एकूण क्षेत्र (हे.आर) | वसूल रक्कम रुपये (लाखात) | भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित केलेल्या प्रकरणांची संख्या | भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित केलेले क्षेत्र (हे.आर) | वसूल रक्कम रुपये (लाखात) | शिल्लक प्रकरणांची संख्या | शिल्लक प्रकरणांचे क्षेत्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) |
| एकूण | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-६(२)

विषय : भाडेपट्टयाने अथवा कब्जेहक्काने प्रदान केलेल्या शासकीय जमिनींपैकी कृषिक / निवासी / वाणिज्यिक/ औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या जमिनींचा धारणाधिकार भोगवटादार वर्ग-१ मध्ये रूपांतरित करण्याकरिता शासन राजपत्रात अंतिमत: प्रसिद्ध केलेले "महाराष्ट्र जमीन महसूल (भोगवटादार वर्ग-१ आणि भाडेपट्टयाने प्रदान केलेल्या जमिनी भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित करणे) नियम,२०१९ (अधिसूचना क्र. जमीन-२०१८/प्र.क्र.९०/ज-१, दि.८.३.२०१९)" अन्वये कार्यवाही.

अहवालाचा महिना : अखेर

विभाग :-

| अ.क्र. | जिल्हा | निवासी / वाणिज्यिक / औद्योगिक प्रयोजनासाठी भोगवटादार वर्ग-२ धारणाधिकारावर किंवा भाडेपट्ट्याने प्रदान केलेल्या किंवा प्रदानानंतर असा वापर अनुज्ञेय करण्यात आलेल्या जमिनीचे भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरण करण्यासंबंधी प्रकरणांची संख्या (दि.०३.०३.२०२० अखेर) | एकूण क्षेत्र (हे.आर) | वसूल रक्कम रुपये (लाखात) | भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित केलेल्या प्रकरणांची संख्या | भोगवटादार वर्ग-१ मध्ये रुपांतरित केलेले क्षेत्र (हे.आर) | वसूल रक्कम रुपये (लाखात) | शिल्लक प्रकरणांची संख्या | शिल्लक प्रकरणांचे क्षेत्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) |
| एकूण | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-७

## विषय : भाडेपट्टा नुतनीकरण मोहीम

अहवालाचा महिना : अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | एकूण भाडेपट्टयांची संख्या | दिनांक ३१.०७.२०२० रोजी नुतनीकरणास पात्र भाडेपट्टयांची संख्या | दिनांक ०१.०८.२०२० पासून अहवाल महिनाअखेर नुतनीकरणास पात्र भाडेपट्टयांची संख्या | दिनांक ०१.०८.२०२० पासून अहवाल महिनाअखेर नुतनीकरण केलेल्या भाडेपट्टयांची संख्या | अहवाल महिना अखेर नुतनीकरण प्रलंबित भाडेपट्टयांची संख्या (४)+(५) - (६) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) |
| १ | | | | | | | |
| २ | | | | | | | |
| ३ | | | | | | | |
| ४ | | | | | | | |
| ५ | | | | | | | |
| ६ | | | | | | | |
| एकूण | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-८ (१)

## विषय- अर्ध-न्यायिक प्रकरणे निर्गत करणे

अहवालाचा मांहना: अखेर

विभाग :-

| विषय | जिल्हा | दि. ३१ जुलै, २०२० अखेर प्रलंबित असलेल्या अर्धन्यायिक प्रकरणांची स्थिती | | | दि. ३१ जुलै, २०२० नंतरच्या प्राप्त अर्धन्यायिक प्रकरणांचे निर्गतीबाबतची स्थिती | | | | एकूण शिल्लक प्रकरणे (५+९) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | दि. ३१ जुलै, २०२० रोजीची प्रलंबित प्रकरणे | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित प्रकरणांपैकी अहवाल महिना अखेर निकाली काढलेली प्रकरणे | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित प्रकरणांपैकी शिल्लक प्रकरणे | मागील महिना अखेर प्रलंबित प्रकरणे | अहवाल महिन्यातील आवक | अहवाल महिन्यात निकाली काढलेली प्रकरणे | अहवाल महिनाअखेर शिल्लक प्रकरणे | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) |
| महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम २४७ अन्वये अपील प्रकरणे | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| **एकूण एकंदर** | | | | | | | | | | |
| महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम २५७ अन्वये पुनरीक्षण प्रकरणे | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| **एकूण एकंदर** | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |

| विषय | जिल्हा | दि. ३१ जुलै, २०२० अखेर प्रलंबित असलेल्या अर्धन्यायिक प्रकरणांची स्थिती | | | दि. ३१ जुलै, २०२० नंतरच्या प्राप्त अर्धन्यायिक प्रकरणांचे निर्गतीबाबतची स्थिती | | | | एकूण शिल्लक प्रकरणे (५+९) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | दि. ३१ जुलै, २०२० रोजीची प्रलंबित प्रकरणे | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित प्रकरणांपैकी अहवाल महिना अखेर निकाली काढलेली प्रकरणे | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित प्रकरणांपैकी शिल्लक प्रकरणे | मागील महिना अखेर प्रलंबित प्रकरणे | अहवाल महिन्यातील आवक | अहवाल महिन्यात निकाली काढलेली प्रकरणे | अहवाल महिनाअखेर शिल्लक प्रकरणे | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) |
| महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम २५८ अन्वये पुर्नविलोकन प्रकरणे | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| **एकूण एकंदर** | | | | | | | | | | |
| कुळ वहिवाट अधिनियमानुसार अपील | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| **एकूण एकंदर** | | | | | | | | | | |
| कुळ वहिवाट अधिनियमानुसार पुनरीक्षण | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | |
| **एकूण एकंदर** | | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल- प्रपत्र अ- ८(२)

विषय : EQJCOURT वरील अर्धन्यायिक प्रकरणे Online द्वारे आढावा

अहवालाचा महिना : अखेर

विभाग :-

| दाखल-निर्गत-प्रलंबित केसेस बाबत माहिती | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा | अहवाल काळातील केसेस | | | | | | उद्दिष्ठानुसार निकाली प्रमाण महिना ४० प्रमाणे निकाल | एकूण निकाली प्रमाण |
| | | आरंभीच्या केसेस | दाखल केसेस | एकूण केसेस | निकाली केसेस | शिल्लक केसेस | दाखल नुसार निकाली प्रमाण | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) |
| १ | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | |

# महाराजस्व अभियान

प्रगती अहवाल-प्रपत्र अ-९

**विषय : एक महिन्याच्या वर प्रलंबित असलेले फेरफार निकाली काढणे व त्याकरिता तहसिल / मंडल मुख्यालयात फेरफार अदालत घेणे.**

अहवालाचा महिना: अखेर

**विभाग :-**

| अ.क्र. | जिल्हा | दि. ३१ जुलै, २०२० अखेर प्रलंबित असलेल्या फेरफारांची संख्या | | | दि. ३१ जुलै, २०२० नंतरच्या प्राप्त फेरफार संख्या | | | | एकूण शिल्लक फेरफारांची संख्या (५+९) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | दि. ३१ जुलै, २०२० रोजीची प्रलंबित फेरफारांची संख्या Online MIS प्रणालीनुसार | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित फेरफारांपैकी अहवाल महिनाअखेर निकाली काढलेल्या फेरफारांची संख्या | दि. ३१ जुलै, २०२० रोजीच्या प्रलंबित फेरफारांपैकी शिल्लक फेरफारांची संख्या | मागील महिना अखेर प्रलंबित फेरफारांची संख्या | अहवाल महिन्यातील आवक फेरफारांची संख्या | अहवाल महिन्यात निकाली काढलेल्या फेरफारांची संख्या | अहवाल महिनाअखेर शिल्लक फेरफारांची संख्या (६)+(७)-(८) | | |
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) |
| १ | | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | |
| ४ | | | | | | | | | | |
| ५ | | | | | | | | | | |
| ६ | | | | | | | | | | |
| एकूण | | | | | | | | | | |

